

...च्या तिरीं नांदे कोळेश्वर गौरीनाथ महाराज।

श्री.

# भक्त्या समर्पणम्।

वन्देतं. परमात्मानं ब्रह्म विष्णू शिवात्मकं ।।
कोळेश्वराभिधं देवं कोळथर ग्रामवासिनम् ।। ।। १ ।।

यस्य मूर्ध्नि शुभा गंगा प्रादुर्भवति प्रत्यहम्।
जलाभिषेक समये सिंहनादं करोति यः ।। २ ।।

तस्य देवस्य माहात्म्यं श्रुतं वृद्धमुखेनयत्।
संशोध्य लेखान् प्राचीनान् कृतवान् राष्ट्रभाषया ।। ३ ।।

नारायणो वामनिरहं जोशी शांडिल्यगोत्रजः।
अजरालय (आंजर्ले) ग्रामवासी चित्तपावनवंशजः ।। ४ ।।

मयाऽर्प्यते पुष्पमिदं कोळेश्वरपदाम्बुजे ।।
अनेन प्रीयतां देवो भक्तानां कामपूरकः ।। ५ ।।

× × × ×

श्रीकोळेश्वर विष्णुरुद्र विधि हा लोकत्रयीं वर्ततो।
भक्तांचे निजपूर्णकाम करितो अब्धी तिरीं राहतो।
ज्याचें नाम अर्धे हरी जड मुढां नामेंचि उद्धरी।
गंगा वाहत मस्तकीं निजवधू नामांकि जो सुंदरी ।। ? ।।

सांप्रदायिक श्लोक

# प्रथमावृतीचे प्रस्तावनेचे दोन शब्द.



रत्नागिरी जिल्ह्यांत जीं कित्येक प्रसिद्ध देवस्थाने आहेत त्यापैकींच कोळथरें येथील श्री कोळेश्वराचें देवस्थान होय. बहुतेक चित्पावन ब्राह्मणांचें रत्नागिरी जिल्हा हेंच मूळ स्थान असून त्यांतून शेंकडों चित्पावन ब्राह्मणांचीं कुटुंबें महाराष्ट्र, वऱ्हाड व नागपूर या प्रांतांत गेलीं आहेत व कित्येक बृहन्महाराष्ट्राबाहेर काशी, रामेश्वर, यांसारख्या हजार मैल दूर असलेल्या प्रदेशांतहि आढळत आहेत. यांपैकीं कैक जणांनीं कोंकण प्रांत डोळ्यांनीं पाहिला देखील नसेल. तथापि ज्या कांहीं नाजुक व प्रबल रज्जूंनीं त्यांची मनें कोंकणानें बांधून टाकलीं आहेत त्यांत तिकडील कुलदैवते ही एक प्रबल रज्जू समजण्यास हरकत नाहीं. कोंकणाबाहेर शेंकडों वर्षांपूर्वी बाहेर पडलेल्या कोंकणस्थांची कोंकणांत शेतवाडीहि उरली नसेल, घरदारहि उभें नसेल किंवा पडून मातीस मिळालेल्या घरांच्या चौथऱ्याचें त्यांना स्मरणहि उरलें नसेल; किंबहुना परप्रांतीं जाऊन आपल्या पराक्रमाच्या व बुद्धिसामर्थ्याच्या जोरावर त्यांनीं एवढें वैभव व जहागिरीहि संपादन केलेल्या आहेत कीं त्यांच्यापुढें तीं कोंकणचीं तुटपुंजी भातशेती व चार नारळी पोकळीचीं झाडें यांची त्यांस खातरहि वाटत नसेल. तथापि ज्यांच्या समोर त्यांच्या वैभवास नमावें लागतें व त्यांना स्वतःलाहि मस्तक ठेंगणें करावें लागतें आणि संकटकाळीं, तसेंच ऐश्वर्याच्या भरांतहि ज्यांचें स्मरण ठेवावें लागतें अशीं जर कोंकणांत अद्यापि कोणतीं स्थळें असतील, तर तीं त्यांचीं कुलदैवतें होत. सणवारास व विशेषतः थोरल्या दिवाळीस चित्पावन ब्राह्मण असतील तेथून आपल्या कुलदैवतांचा नामोच्चार करून त्यांस नैवेद्य समर्पण करीत असतात.



महाराष्ट्रांत पटवर्धन, घोरपडे, भावे इत्यादि चित्पावन जहागिरदार आहेत. त्यांतील बहुतेकांनीं कोंकणच्या कुलदैवतांची मंदिरें बांधून उत्कृष्ट स्थितींत ठेवली आहेत व त्यांच्या नैवेद्य नंदादीपांचींहि व्यवस्था केली आहे. त्याचप्रमाणें इतर सुस्थितींतील कोंकणस्थांनीहि आपलीं यासंबंधाचीं कर्तव्यें बजावल्यामुळें कोंकणांत हल्लीं बहुधा एकहि देवालय असें आढळणार नाहीं कीं ज्याचा परामर्ष उत्तम रीतीनें घेतला जात नाहीं. तथापि दूरदेशीं गेलेल्यांना आपल्या कुलदैवताच्या दर्शनाकरितां कोंकणांत जाण्याचा सुयोग कैक पिढ्यांत लाभत नाहीं. पण त्यांना त्यांजविषयीं एक प्रकारची उत्सुकता असते यांत शंका नाहीं. ती उत्सुकता त्यांचे इतिहास वाचून व छायाचित्रें पाहून अंशतः भागण्यासारखी असल्यानें अशा प्रकारचें कार्य त्यांच्याकरितां जर कोणी केलें तर ते त्यांचे उतराई झाल्यावांचून रहाणार नाहींत. कोळेश्वर देवस्थानाचा हा लहानसा इतिहास लिहून माझे मित्र वे. शा. सं. नारायण वामन शास्त्री जोशी यांनीं हीच कामगिरी बजावली आहे. **कोळेश्वर हा भावे, बर्वे, कोल्हटकर, बाम, गोमरकर, मोडक, दातार, सोमण, पेठे, इत्यादि आडनांवांच्या कोकणस्थ ब्राह्मणाचा कुलस्वामी आहे.** त्याचें देवालय दापोली तालुक्यांत समुद्रतीरीं फार रमणीय स्थळीं आहे. मी कोंकणांत गेलों होतों तेव्हां आम्हां भाव्यांचें मूळ गांव रत्नागिरीजवळील जूनवाडा हें पाहिलें व परंपरेनें ऐकत आलेल्या कुलदेवतांचींहि दर्शनें घेतलीं. बहुतेक त्या सर्व देवता जूनवाड्यापासून कोस अर्धा कोसाच्या आंतच आहेत. पण त्यापैकीं दर्शन घडलें नाहीं तें एका श्री कोळेश्वराचें. कारण हें देवालय रत्नागिरीपासून फारच दूर आहे. त्यावेळीं जो योग आला नाहीं तो योग या पुस्तकांतील देवाचे व देवालयाचें चित्र पाहून आला. तेव्हां केवढा तरी आनंद झाला. हा आनंद विशेष होण्याचें

आणखी एक कारण असें आहे कीं, देवासंबंधीं जी विस्तृत माहिती त्या स्थळीं जाऊनहि मिळाली नसती ती मला पुण्यांतल्या पुण्यांत बसल्या जागीं मिळाली. हा लाभ जसा मला झाला तसाच दूरदेशीं गेलेल्या वरील देवाच्या भक्तांनाहि हें पुस्तक वाचून होईल यांत संशय नाहीं. रा. जोशी यांनीं केलेल्या कामगिरीचें हेंच महत्त्व असून त्याचे चीज त्या त्या कोंकणस्थांकडून झाल्यावांचून रहाणार नाहीं.

रा. जोशी यांनीं प्रस्तुत पुस्तकांत श्री कोळेश्वराची उत्पत्तिकथा, तिचें प्राचींनत्व, देवालयाचें वर्णन, देवाची पूजाअर्चा, देवासंबंधीं श्रवणी आलेले चमत्कार, आरत्या इत्यादि सर्व माहिती जितकी उपलब्ध झाली तितकी गेल्या दोन तीन वर्षांत श्रमपूर्वक जुळवून आतां पदरमोड करून पुस्तकरूपानें प्रसिद्ध केली हें त्यांचें श्रीच्या ठिकाणीं असलेल्या निष्ठेचेंच द्योतक होय. स्वतःची सांपत्तिक स्थिति अनुकूल नसतांहि त्यांनीं हें कार्य शेवटास नेलें याबद्दल श्री कोळेश्वराच्या भक्तांनीं त्यांजविषयीं जितकी कृतज्ञता दाखवावी तितकी थोडीच आहे. त्यांच्या या कार्यास येथील प्रसिद्ध नागरिक श्रीमंत दातार यांनीं जसें आर्थिक सहाय्य केलें तसेंच इतरांनींहि स्वशक्त्यनुसार केल्यास त्यांस आलेला सर्व खर्च सहज निघून जाईल हें सांगावयास नकोच. शेवटीं श्री कोळेश्वराची अल्पस्वल्प सेवा या प्रस्तावनेच्या रूपानें करण्याचा योग माझे मित्र रा. नारायणशास्त्री जोशी यांनीं आणून दिल्याबद्दल त्यांचे आभार मानून हा लेख पुरा करतों.

पुणें आश्विन वद्य १०<br>शके १८५३

**वासुदेव कृष्ण भावे**<br>सह संपादक केसरी.

# द्वितीयावृत्तीचें निवेदन.

**श्री. कोळेश्वराय देवाय त्रिगुणात्मक मूर्तये ।**<br>**भक्तकारुण्यपूर्णाय वरदाय नमो नमः ॥**

आज श्रीकृपेनें श्रीकोळेश्वर देवस्थानाच्या इतिहासाची द्वितीयावृत्ति भक्तजनांपुढें समर्पण करण्यांत आम्हांला आनंद होत आहे.

परशुरामानें उन्मार्गगामी म्हणजे उद्धट राजांचा एकवीस वेळा पराभव करून अखंड भारतावर सत्ता प्रस्थापित केली. हें करतांना अनेक तऱ्हेची हिंसा त्याचे हातून घडली. तिचे पापक्षालनार्थ त्यानें मोठा अश्वमेध यज्ञ केला व त्यांत जिंकलेली सर्व पृथ्वी ब्राह्मणानां दान दिली. यामुळें पुढें त्याला स्वतःला निवासाकरतां स्थान नाहींसे झालें. कारण——

**दत्ते स्थले न वस्तव्यं वासोऽयं धर्मन्हासकः ।**<br>**इत्थं विचिंत्य मुनिराट् गतःसह्यस्य दक्षिणे ॥ १ ॥**<br>**लोकयन् सकलां पृथ्वीं चचार गगनस्थितः ॥**

सह्याद्रि खंड अ. ५५

दान दिलेल्या भूमीचा उपभोग घेणें शास्त्र दृष्टया हानिकारक असल्यानें निवासस्थान शोधण्याकरतां तो आकाश मार्गानें सर्व पृथ्वीचें निरीक्षण करूं लागला कोठेंहि निवासाला उचित असें समाधानकारक स्थान न दिसल्यामुळें तो परत सह्यपर्वतावर आला. त्याला पर्वताचें विविध प्रकारचें सौंदर्य, फल, पुष्प, दिव्यवनस्पति यांची समृद्धि, अनेक ठिकाणी स्वच्छ व मधुर जल वाहणारे निर्झरादि पाहून आनंद झाला व या पर्वताच्या समीपच वास्तव्य करावें असें ठरवलें – राहाण्याकरतां अपेक्षित असलेलें स्थान समुद्राजवळ मागावें, अशी कल्पना सुचल्यामुळें रामाने मोठ्या नम्रपणें समुद्राला विनंति केली कीं——

**' वासार्थं मेदिनीं देहि मठमात्रांचमे प्रभो '**

सागरा, मठ–आश्रमाला पुरेशी मला भूमि दे. तितक्याच गर्वाने समुद्राने उत्तर दिलें– **मेदिनीं न प्रदास्यामि रेखामात्रामपि '** रेसभर सुद्धां मी भूमी देणार नाहीं. या उत्तरानें क्रुद्ध झालेल्या रामानें बाण सामर्थ्यानें १०० योजनें लांब व सहा योजनें रुंद अशी भूमि समुद्रापासून मिळविली. तिलाच " **इषुपातरामक्षेत्र** " असें म्हटलें जातें. ही सुपाचे आकाराची असल्यानें हिचें दुसरें नांव ' **शूर्पारक** ' असें आहे. या शूर्पारकक्षेत्राचे वर्णन भारत वनपर्वामध्यें आलें आहे. परशुरामानें या क्षेत्राचे भाग पाडले त्यांत– कोंकण हें एका भागाचें नांव आहे. **कौंकण** शब्दाची व्युत्पत्ति खालील प्रमाणें आहे.

' **कुकणाद्वर्धितं यस्मात् जातं तत् कौंकणाभिधम्** ' कु. म्ह. पृथ्वी. तिच्या कणाकणाची मशागत–मेहनत करून लागवडीला–निवासाला योग्य–असा हा भाग केल्यामुळें याला कौंकण म्हटले जातें. कै. चिंतामणराव वैद्य म्हणतात– " कोंकण म्हणजे रत्नागिरी जिल्हा " ( गोखले घराण्याचा इतिहास प्रस्तावना ) हें विधान सह्याद्रि खंडाशी जुळतें. कारण– **केरलश्च तुरंगश्च तथा गोमांतसंज्ञकः ।। इत्येते कौंकणस्यास्य उपदेशाः प्रकीर्तिताः ।** स. खं. अ. ५५ यांत गोमांतक हा कोंकण भागाचा उपदेश म्हटला आहे. म्हणजे कोंकणची सीमा गोमांतकापर्यंत जाते. ज्या अर्थी ' गोमांतक ' हा कोंकणचा उपदेश म्हटला आहे, त्या अर्थी गोमांतक हा महाराष्ट्रांतच विलीन झाला पाहिजे या म्हणण्याला ऐतिहासिक सबळ पुरावाच आहे. असो. –कोंकणस्थ म्हणजे " कोंकणांत राहाणारा " हा जरी सामान्य अर्थ असला तरी हा शब्द रूढयर्थानें विशेष जातिवाचक ओळखला जातो. कोंकणस्थ



म्हणजे चित्पावन ब्राह्मण होय. परशुरामानें आपले क्षेत्रांत अनेकांची वसाहत केली त्यांत उत्तरेकडून –हिमालयांतून अत्यंत विद्वान्, बुद्धिमान् वेदांतवादरत, आचार संमन्न असे चौदा गोत्रांचे ब्राह्मण आणून त्यांची ज्या भागांत वसाहत केली त्याभागाला ' आर्यावर्त ' असें म्हटलें आहे.

**शारत्र्या उत्तरतो याव त्सावित्र्या सिंधुसंगमः**
**आर्यावर्तो नाम देशस्तत्र मे चित्तपूरणम्**

गुहागर महात्म्य.

शास्त्री नदी ( जयगडची खाडी ) च्या उत्तर तीरापासून उत्तरेकडे सावित्री नदी ज्याठिणीं सागराला मिळते ( बाणकोट, रत्नांगिरी जिल्ह्याचें उत्तर टोंट ) तन्मध्यवर्ति प्रदेश हा आर्यावर्त होय. हा देश-भाग पाहून–म्हणजे त्यांतील ब्राह्मण बुद्धिमान, आचारसंपन्न, विद्वान पाहून माझें चित्त प्रसन्न होतें. या आनंदाच्या भरांत पशुराम म्हणतात–

**अधुता ममचित्तस्य पावनं क्षेत्र मस्तु तत्**
**अत्र विप्रा ब्रह्मविदो नाम्ना तेन महोज्वलाः ।।**

आतां आजपासून या क्षेत्राला मी ' चित्तपावन ' क्षेत्र म्हणतों व क्षेत्रांत राहाणाऱ्या तेजस्वी, विद्वान, ब्राह्मणानां, ' चित्तपावन ' हें नांव देतों यावरून चित्तपावन ही संज्ञा परशुरामनेंच ठेवली हें स्पष्ट आहे. चित्तपावन ब्राह्मण हा तेजस्वी, विद्वान्, बुद्धिमान, प्रयत्नवादी, महत्वाकांक्षी असतो असे वर्णन पुष्कळ ठिकाणीं केलेलें आढळतें. छत्रपति **शिवाजी महाराज परशुराम** क्षेत्रांत **परशुरामाचे दर्शनार्थ** आले असतां **म्हणतात– " या क्षेत्रांत ब्राह्मण वस्ती खूपच. वर्णानें गोरे, बुद्धीनें चलाख, अन् स्वभावानें लाख. पण अतिशय व्यवहारी, बोलण्यांत फार गोड. बोलते वेळीं अनुस्वारान् अनुस्वार मोजून घ्यावा. चित्तपावन ब्राह्मण, "**

(पुरंदरे कृत शिवचरित्र पूर्वार्ध पृ. ४४५)

चित्तपावनांची १४ गोत्रें व साठ उपनांवें. उपनांवें म्हणजे कुळें. घराणीं फार प्राचीन आहेत. उपनांवें हीं विद्या, बुद्धिवैभव, उद्योग-धंदा, गुण, अवगुण, देश, काल इत्यादि निमित्तानें बदलत जातात. व त्याप्रमाणें आज साठाचीं तीनशेंच्या वर गेली आहेत. तरीं तीं सर्व चौदा गोत्रांतच अंतर्भूत होतात. गोत्र बदलत नाहीं. बदललेंहि नाहीं. ( नाना सो. चापेकर कृत चित्तपावन पुस्तक पहा ) तात्पर्य– सर्व चित्तपावन ब्राह्मणांचे मूळ वसतिस्थान चिपळूण परिसर म्हणजे जयगड-रत्नागिरी ते बाणकोट हें होय. आज जरी चित्तपावन फार दूर ठिकाणीं कांहीं पिढ्या रहात असला तरी त्याचे प्राचीन मूळ स्थान हा 'आर्यावर्त' होय. प्रायः यामुळेंच सर्व चित्तपावनांची– वाडेश्तर, वेळणेश्वर, महाकाली, दुर्गा, लक्ष्मीकेशव, लक्ष्मीनृसिंह, केशवराज, गणपति इत्यादि कुलदैवतें या भागांतच आहेत. हाहि वसहतीचा पुरावा आहे.

श्रीकोळेश्वर दैवत या पैकींच आहे. भावे, बर्वे, वाड, बाम, कोल्हटकर, पंचनदीकर मोडक, कांही पेठे इत्यादि चित्तपावन घराण्याचें हें कुलदैवत आहे. तसेंच कोळथरें गांवांतील आधारकर जोशी, बडे, कर्वे इत्यादि घराण्यांचे कुलदैवता इतकेंच हें उपास्य. व इष्ट दैवत आहे. कै. रामचंद्र विठ्ठल जोशी यांस कोळेश्वराचें दर्शन झालें होतें. उद्योगधंद्या निमित्त **दूर दूर ठिकाणीं गेलेल्या भक्त जनानां आपल्या कुलदेवतेचें–उपास्य देवतेचें दर्शन व यशः श्रवण घडावें, हाच हेतु पुस्तक प्रकाशन करण्यांत आहे.**

शके १८५३ मध्यें प्रथमावृत्ति प्रकाशित झाली. त्या नंतर आर्थिक सामर्थ नसल्यामुळें स्वस्थ होतों. चार वर्षांपूर्वी कै. सदाशिव नारायण जोशी, कोळथरकर. (मुंबई ताराबाग) यांनीं द्वितीयावृत्ति बद्दल लिहिलें. म्हणून मुंबईला जाऊन त्यांची भेट घेतली व आहे असेंच पुनः पुस्तक छापण्यापेक्षां अधिक माहिती मिळाली तर फार चांगलें. अर्थांत याला विलंब लागणार. प्रयत्न करतों. हा विचार मी त्यांना सांगितला. तो त्यांना पटला. नंतर स्वाभाविकच अधिक माहिती मिळवण्याचे दृष्टीनें मी प्रयत्न सुरू केला. जेथें



जेथें धागादोरा दिसेल तेथें जाऊन लेखन, वाचन व समक्ष भेटी घेऊन माहितीचें टांचण करूं लागलों. श्री. **कमलाकर महादेव आधारकर** यांचा परिचय झाला. त्यांनी देवस्थान विषयक असलेलें पणजोबांचे जुने कागद पत्र मोठ्या प्रेमानें दिले. आनंद वाटला. त्यांचे टांचण केलें. इतक्यांत, श्री. सदाशिवराव जोशी यांस आयुष्य कमी झालें. आमचा आधार गेला. स्वाभाविकच मन विषण्ण झालें· 'गतं न शोच्यं' असें समाधान मानून श्रीवर निष्ठा ठेवून कार्य चालू ठेवलें. कऱ्हाडला लाटे घराण्यांतील श्री. **गोविंदराव लाटे–भागवत** आहेत त्यांचेकडे माहिती मिळेल समजल्यानंतर तेथें गेलों, मुक्काम केला. त्यानींहि फार मोठ्या आदरानें देवस्थान विषयक कागदपत्र दाखविले. त्यांचें टांचण केलें. पुण्याला आठ दिवस राहून भारत इतिहास मंडळांत जाऊन श्री. **ग. ह. खरे** यांची गांठ घेतली. त्यांनी सहानुभूतिपूर्वक पुस्तकें वाचावयास दिलीं. तेथेंच त्यांनी ( अॅलिनेशन ऑफीस पूणा दप्तरमधील ) **ओंकार** यांचा परिचय करून दिला. यामुळें त्या सरकारी संस्थेंत प्रवेश मिळाल्यानें जुनें पेशवे दप्तर पहाण्यास मिळालें. दाभोळचे श्री. जगन्नाथ जोशी मास्तर पेन्शनर यांनीं कांहीं माहिती लिहून पाठविली. याप्रमाणें सर्वत्र मिळालेल्या माहितीचें संगतवार टांचण करून कच्ची प्रत तयार झाली. पण प्रकाशनाचें काय–असा विचार येतांच कै. सदाशिवराव जोशी यांचे बंधु-**मधुसूदन नारायण जोशी** यांनी बंधूचे इच्छेनुसार यथाशक्ति मदत देण्याचें आश्वासन दिलें. श्री. **कमलाकर दादा आधारकर**, झावबाचीवाडी लक्ष्मी चाळ, यानीं मोठ्या प्रयत्नानें मिळविलेली माहिती, तशीच ठेवण्यापेक्षां प्रकाशित करावीच. प्रयत्न करूं. श्री. कृपेनें कार्य पूर्ण होईल असा विश्वास दिला. श्री. **केशव सिताराम जोशी, कोळथरें** यांनीं पुस्तक प्रकाशनाबद्दल आग्रह केला. मध्यंतरी मुंबईला गेलों असतां श्री. **नरहर केशव महाजन** दादर, मुंबई. यानीं आश्वासन

दिलें. अर्थात सर्वांच्या प्रोत्साहनाने ही जबाबदारी अंगावर घेतली. श्री. गोविंद भार्गव आधारकर सायन, अतिरुद्राअनुष्ठानाचे यजमान श्री. अनंतराव बर्वे, सुसेरी खेड, सध्या मुक्काम नमर हवेली, दमणप्रांत, श्री. आबासाहेब भावे मोहन बिल्डिंग यांकडून यथाशक्ति मदत आली आहे. तथापि या महर्घतेच्या काळांत-कल्पनेपेक्षां माहिती बरीच उपलब्ध झाल्याने पुस्तक पूर्वीपेक्षां अडीच पट मोठें होत आहे अर्थात खर्चहि फार येत आहे. पुस्तक प्रकाशन हा आमचा धंदा नसल्यानें किंमत व्यापारी भावाने न ठेवतां अल्प ठेवल्याचें सुज्ञांचे लक्षांत येईलच. श्री कोळेश्वर कृपेने व सर्वांच्या सहानुभूतीनें कार्य पूर्ण होईल अशी आशा व्यक्त करून वरील सर्व मंडळीचें अभिनंदन करतों.

यंदाच्या उत्साहापूर्वी पुस्तक प्रकाशित व्हावें, अशी आमची उत्कट इच्छा होती व त्याकरतां बलवंत प्रेसचे व्यवस्थापक व तदनुकूल मंडळी यांनीं फारच मेहनत घेतली. आपलेपणाने काम फार उत्तम रितीने पूर्ण केलें याबद्दल श्रीयुत दाते, होराभूषण मिरखणकर, श्री. बर्वे वगैरे सर्व मंडळींचा मी आभारी आहें. श्रीकृपेनें सर्वांचे कल्याण होवो. अशी शुभेच्छा व्यक्त करून आज ३५ वर्षांनीं कां होईना, ज्याच्या कृपेनें द्वितीयावृत्तीचा सुयोग लाभला त्याच भक्त-वत्सल श्रीकोळेश्वर चरणीं हें वाक् कुसुम समर्पण करून शतशः प्रणाम करतों.

सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वेसन्तु निरामयाः ।
सर्वे भद्राणि पश्यंतु मा कश्चिद् दुःखमाप्नुयात् ॥

इति

मिति. कार्तिक शु. ३ बुधवार
शके १८८७
ता.

विद्याविनोद
नारायणशास्त्री जोशी
आंजर्लेकर.
मु. पो. आंजर्ले, रत्नागिरी.

श्रीप्रसाद बर्वे, डोंबिवली.

# अनुक्रमणिका

**चुकीची दुरुस्ती**–चमत्कार प्रकर्णांमध्यें शेवटीं जो नवसाबद्दल मजकूर आहे. त्याचे आरंभीं–त्यापैकीं एक देतों-या वाक्यापुढें–कोळथरं –मधुसूदन नारायण जोशी, ताराबाग,–मुंबई लिहितात.–असें वाचावें.



लेखक– विद्याविनोद -धर्मशास्त्रकोविद नारायणशास्त्री जोशी, आंजर्लेकर
मु, पो. आंजर्ले ता. दापोली, जि. रत्नागिरी.
सविधान ब्रह्मणस्पतिसूक्त व श्रीसूक्तविधानाचे कर्ते.

श्रीकृष्णः

# श्रीकोळेश्वर देवस्थानाचा संक्षिप्त इतिहास.

## १ कोळथरें गांवची सामान्य माहिती

कोळथरें हा गांव रत्नागिरी जिल्ह्यांतील दापोली तालुक्यांत समुद्र किनारीं दाभोळ बंदरच्या अलिकडे उत्तर दिशेला सुमारें तीन कोसांवर आहे.

**येथें येण्याचे मार्गः**– (१) मुंबई येथून बोटीनें येणें असेल तर भाऊच्या धक्यावरून सकाळीं ८ वा. सुटणाऱ्या दाभोळ लाईनच्या बोटींत बसून दाभोळ बंदरांत उतरावें. साधारणपणें ती बोट दाभोळला संध्याकाळीं ५–६ चे सुमारास पोंचते. दाभोळच्या धक्यासमीपच एस. टी. स्टँड आहे. तेथून एस. टी. नें कोळथरें येथें यावें. सध्यां मुंबई ते दाभोळ बोटीचें तिकीट ६ रु. १२ पैसे आहे. दाभोळ ते कोळथरें एस. टी. तिकीट ४० पैसे आहे.

(२) **दुसरा मार्गः**– मुंबई कोळथरें एस्. टी. नें वा मुंबई दाभोळ एस. टी. नें येणें असेल तर दाभोळच्या अलिकडे फाट्यावर उतरावें. तेथून विशेष सामान नसेल तर चालत यावें. अथवा दाभोळ–कोळथरें एस. टी. नें कोळथरला यावें. किंवा मुंबई–दापोली गाडीनें दापोलीला यावें तेथून कोळथरें गाडीनें कोळथरें येथें यावे, ही गाडी दापोलीहून दुपारीं ३ वा. सुटते. मुंबई–दापोली गाडी मुंबईहून सकाळीं

६ चे सुमारास निघून दापोलीला दुपारीं सुमारें २ ते २-३० ला येते.

(३) **तिसरा मार्गः–** देवगड, सावंतवाडी, मालवण, वगैरे दक्षिण भागांतून येणें असेल तर त्या त्या ठिकाणाहून सुटणाऱ्या एस. टी. नें रत्नागिरीला यावें. नंतर रत्नागिरी-दापोली गाडीनें दापोलीला यावें. तेथून वरीलप्रमाणें कोळथरें येथें यावें. रत्नागिरी दापोली एस. टी. तिकीट ५ रु. आहे.

कोळथरें हा गांव पूर्वेकडे डोंगर व पश्चिमेकडे समुद्र यांच्या अरुंद पट्टींत वसलेला आहे. येथील हवा निरोगी असल्यामुळें आजाराचें प्रमाण कमी असतें.

कोळथरें हा गांव कोणी केव्हां वसविला हें नक्की समजत नाहीं. पण ५०० वर्षापूर्वीची बरीच जुनी वसाहत आहे हें निश्चित. जुन्या कागदपत्रांतून कोळथरें तर्फ पंचनदी तालुका सुवर्णदुर्ग असा उल्लेख आढळत असला तरी पंचनदी गांवांतील आगरभागांत आज जी वसाहत आहे तत्पूर्वीच कोळथरे हा गांव सुखसमृद्ध व भरभराटींत होता हें मोडक घराण्याच्या इतिहासावरून स्पष्ट दिसतें. कारण आगरभागाची निर्मिति मोडक घराण्यांतील ज्या पुरुषानें केली तो पुरुष कर्ले भाटे रत्नागिरी येथून येऊन प्रथम कोळथरें येथें आला त्यावेळीं सध्यांचा पंचनदीचा आगरभाग हें मोठें जंगल होतें. तेथें कोळथरें येथील लोक लांकडें वगैरे आणण्याकरतां जात असत. पुढें मोडक घराण्यांतील वंशजानें दिल्लीच्या बादशहाकडून कांहीं हक्क मिळविले. वसाहतीकरतां ती जागा मिळवून नंतर मोडक पंचनदीला गेले. (मोडक घराण्याचा इतिहास पृष्ठ २१ ऐतिहासिक संग्रह १-३ पहा) नंतर कांहीं दिवसांनीं बहिरवाडी येथें रहाणारे राणे व मोडक यांच्यांत वाद उपस्थित होऊन तो त्यावेळचे अधिकारी कान्होजी आंग्रे सरखेल यांचेकडे गेला. तो शक १६३१ आहे. कोळथरें गांवचें क्षेत्रफळ, ११०० एकर असून लोकसंख्या अदमासें १५०० चे घरांत आहे. गांवांत ब्राह्मण, सोनार, कुंभार, गुरव, भंडारी, कुणबी वगैरे हरिजनावांचून सर्वजातीची वस्ती आहे. कांहीं वर्षापूर्वी ब्राह्मण वस्तीचीं घरें ५० होतीं पण कूळकायद्यामुळें व वाढत्या महर्गतेमुळें कमी होत होत सध्यां सुमारें ४० घरें आहेत. सर्वत्रच हा परिणाम दृष्टीला पडतो. खेडेगांवची सुधारणा म्हणतां म्हणतां एकेक खेडीं ओस पडत आहेत. हा काल महिमा. येथील लोकांचा धंदा शेती करणें, नारळ सुपारीची लागवड करणें, हा होय. शिक्षणाच्या क्षेत्रांत मात्र हल्ली फार सुधारणा होत आहेत मराठी सात इयत्ता व इंग्लिश १० वी पर्यंतचा वर्ग चालू आहे. आतां हाय स्कूल झालें आहे. सर्व ग्रामस्थ त्या दृष्टीनें पुढें पाऊल टाकीत आहेत. कोंकणचा कोणताही भाग घ्या तो निसर्ग सुंदर असतोच पण त्यांतही हा गांव समुद्र किनारी असल्यामुळें याचा देखावा अत्यंत रमणीय व मनोवेधक असा आहे. येथें वरचा गणपति, श्रीदुर्गा, बापेश्वर, कोळेश्वर हीं फार जुनी देवस्थानें आहेत. श्री गोपाळकृष्ण मंदिर याला सुमारें १७५ वर्षे झालीं. या देवस्थानांबद्दलची माहिती कै. गो. ग. आचवल यांनीं लिहिलेल्या "विश्वव्यापी वैदिक संस्कृति" पुस्तकांत मिळते. ती येथें उध्दृत करतों. पृ. १२५

" इ. सन १७७८।७९ श्रीदुर्गा मौजे कोळथरें येथें प्राचीन देवालय होतें. तें श्यामलांचे (हबशाचे) दंग्यांत दग्ध झालें. बहुत

वर्षे देवीची स्थापना नव्हती. त्यास सालमजकुरी ग्रामस्थांनीं नवीन देवालय बांधलें व देवीची स्थापना केली."

"इ. स. १७७४ विसाजी हरी बाम यांनीं श्रीकृष्णाचें देवालय बांधलें. यासी नेमणूक ५२ रुपये. या देवळांत बलराम, कृष्ण, रेवती, रुक्मिणी अशा मूर्ति आहेत." समोर गरुडाची मूर्ति आहे. या गावांत बाळाजी त्रिंबक छत्रे हे रहात होते व गणेश भट भागवत हे रहात होते.

बापये यांनीं बापेश्वराचें देवालय बांधलें. गांवांत महादेव बल्लाळ, गणो बल्लाळ, आपाजी बल्लाळ, रामाजी बल्लाळ बापये असे चार भाऊ होते. यापैकीं गणो बल्लाळ बापये हा काशींत गेला व त्यानें संन्यास घेतला. त्यानें आपली जमीन-वाडी सर्व, आपले दशांतील बापयांस लिहून दिली. काशीत कागद लिहिला, त्यावर दहा जणांच्या सह्या आहेत. आपाजी बल्लाळ बापये यास बाटवून दंडा राजपुरीं नेला. त्याचे अगोदर हबशाने गांव लुटला व [1]जाळला होता. बाम व बापये एक आहेत. बाम-बापये परस्पर दहा दिवस सुतक धरणारे आहेत व धातोंडकर वैद्य हे तीन दिवस सुतक व सोयर धरणारे आहेत. (सध्यां गावांत बापये कोणीच नाहीं व धातोंडीला वैद्यही नाहींत.) बापये यांना पुत्रसंतति नसल्यामुळें त्यांनीं बाम यांना जमीन-वाडी देऊन टाकली. जनार्दन रुद्र व विसाजी हरि बाम विरुद्ध गणोराम व त्रिंबक बापूजी बडवे यांचा तंटा होता. त्या वेळीं या गोष्टी बाहेर आल्या आहेत. बडवे (बडे) हे कोळथरें येथें मळे या

टीप-१ याची खूण बापेश्वराचे देवालयाजवळ भग्न नंदी दिसतो.



गावांतून आले असें त्या वादांत निष्पन्न झालें आहे. (वि. वै. संस्कृति पृष्ठ १२५) बापेश्वराचा उत्सव माघ वद्य १३-१४-३० असा शिवरात्रीचा तीन दिवस होतो. अलिकडे बापेश्वर मंदिरांत पाणी येऊं लागल्यामुळें श्री. केशव सिताराम जोशी, कोळथरें यांची बहीण कै० गं. भा. गोदावरी दिनकर बागूल हिनें पति-स्मरणार्थ १०० रुपये खर्च करून १९३२ सालीं दुरुस्ती केली. सध्यां मंदिर सुस्थितींत आहे.

बापेश्वराचे उत्तरेस समीपच श्रीदुर्गादेवीचें मंदिर आहे. देवीचा उत्सव चैत्र शु. १३-१४-१५ तीन दिवस होतो. चतुर्दशीचे दिवशीं रथयात्रा असते. रथयात्रेचे समयीं सध्यां बापये नाहींत. तरी देवीचे मंदिरांतून रथ निघतांच पहिला पूजेचा मान त्यांच्या जागेला दिला जातो. यावरून देवीचे देवालयापाशीं बापये यांचा पूर्वी निकटचा संबंध असला पाहिजे. बापये हें घराणें पूर्वी तत्कालीं प्रमुख असावें. बापेश्वर व देवीचें मंदिर ही सर्व जागा त्यांची पूर्वी असली पाहिजे व दंग्यांत देवीचें देवालय दग्ध झाल्यावर त्यांनीं पुढाकार घेऊन पुनः जीर्णोद्धार केला असावा. असें अनुमान करण्यास हरकत दिसत नाहीं. याशिवाय पूजेच्या मानाचा संबंध जुळत नाहीं. हें दुर्गादेवीचें मंदिर पूर्वी गवतानें शिवलें जात असे व त्याकरतां पंचनदीच्या मोडक देशमुखांकडून १००० पेंढ्या गवत व ५०० पेंढे वरचा गणपति व श्रीदुर्गादेवीकरतां येत असे असें पेशवे दप्तर कोंकण जमाव रुमाल २१६ यांत स्पष्ट उल्लेख केला आहे. (मोडक कुलवृत्तांत पुरवणी पृष्ठ ४८ पहा) सध्यां कौलें घातलीं आहेत. श्रीदुर्गादेवी मंदिरासमोर पूर्वेला पूर्वी उल्लेखिलेलें श्रीगोपालकृष्ण मंदिर बाम यांनीं बांधलेलें आहे. या

देवाकरतां बाम यांनीं कांहीं उत्पन्न दिलेलें होतें. कांहीं वर्षांनंतर बाम यांनीं देवालयाची व्यवस्था महाजन यांजकडे सोपविली. त्याप्रमाणें सध्यां विद्यमान असेलेले गावांतील वृद्ध श्री. नारायण विष्णु महाजन हे पहात असतात. देवाची पूजा, उत्सव, समाराधना वगैरेसमयीं उदक सोडणें इत्यादि कार्यांची जबाबदारी महाजन यांजकडे होती. पूर्वीं देवालय गवत अगर झांप यांनीं शिवलें जात असे. पण उत्तरोत्तर गवतादिकांनीं शिवणें त्रासाचें व खर्चाचें होऊं लागल्यामुळें श्री. नारायणराव महाजन यांनीं सुमारें ४० वर्षांपूर्वीं स्वखर्चानें पत्रा घातला. सध्यां वरील तिन्ही देवस्थानांची व्यवस्था ब्राह्मणवर्ग पहात असतो.

**श्रीदत्त मंदिर**-- ब्राह्मण आळींत साठ वर्षांपूर्वी कै. विष्णु त्र्यंबक ऊर्फ अण्णा आघारकर यांनीं आपले खाजगी जागेंत श्री दत्ताचें देवालय इ. स. १९०६ सालीं घुमटीवजा बांधलें असून त्यांत श्रीदत्ताचे पादुकांची स्थापना आहे. (अण्णा आघारकर यांचा यथाप्रसंगीं परिचय देऊं) सध्यां त्याची व्यवस्था त्यांचे वंशज पहातात. असो. याप्रमाणें क्रमप्राप्त श्रीबापेश्वर, श्रीदुर्गा, श्री. गोपाळकृष्ण व श्रीदत्त या मंदिरांची नवीन माहिती जी उपलब्ध झाली ती देऊन सर्वांत प्राचीन, स्वयंभू, व जागृत असें श्रीकोळेश्वर देवस्थान असल्यानें त्यावर फार लोकांची श्रद्धा आहे. शिवाय भावे, कोल्हटकर, बर्वे, पंचनदीकर, मोडक वगैरे घराण्यांचा हा कुलस्वामी असल्यामुळें त्याच्याच दंतकथा, जुने कागदपत्र व प्रत्यक्ष स्थिती याचे आधारें संक्षिप्त इतिहास लिहीत आहे.

## २ श्रीदेव कोळेश्वराची उत्पत्ति दंतकथा

कोळेश्वर हें स्थान स्वयंभू आहे. याविषयीं दंतकथा[1] अशी:– हल्लीं ज्या ठिकाणीं देवालय आहे तेथें पूर्वीं भातशेती करीत असत. एकदां कोळथरें येथील रहिवासी एक कोळी शेतीसाठीं जमीन नांगरीत होता. नांगरतां नांगरतां शेतांतील उदक लाल दिसूं लागलें. तसेंच नागराचे फाळालाहि रक्त लागलेलें दिसलें. पुष्कळ विचार करूनही हा प्रकार काय असावा हें त्याचे लक्षांत येईना. तेव्हां तो कोळी अत्यंत भयभीत होऊन नांगर सोडून घरीं आला.



येतांना मार्गांत जो भेटेल त्याला हें वृत्त सांगूं लागला. झालें. हां हां म्हणतांच एका क्षणार्धांत ही बातमी सर्व गांवभर पसरली. तत्काल चमत्कार पहाण्याकरतां त्या शेताकडे लहान, थोर, वृद्ध सर्व तऱ्हेची सर्व जातीची मंडळी एकत्र जमा झाली. चमत्कार पाहून हा काय प्रकार असावा याचा विचार करूं लागली. पण कांहींएक कारण लक्षांत येईना. अखेर सर्व निराश होऊन आपापल्या घरीं आले. इकडे त्याच कोळचाला रात्रीं स्वप्नांत त्रिगुणात्मक दर्शन देऊन आपण प्रगट झाल्याचें श्रीनीं सांगितलें. मग प्रातःकाळीं उठतांक्षणींच कोळ्यानें रात्रीं झालेला दृष्टांत सर्व लोकांस सांगितला. तेव्हां पुनः पूर्ववत् त्या शेतासमीप सर्व लोक जमा होऊन पहातात तों तें स्वयंभू लिंग दृष्टीस पडलें. मग सर्वांनीं साष्टांग नमस्कार करून भोंवतालची जागा स्वच्छ केली व एक लहानसें देवालय उभारलें. देव कोळचाला सांपडला म्हणून त्याला कोळेश्वर– कोळ्याचा + ईश्वर = स्वामी– या नांवानें संबोधूं लागले.

[1] येथें परिशिष्ट १ लें अवश्य वाचा.

### कोळेश्वर दैवत त्रिगुणात्मक

म्हणजे ब्रह्म–विष्णू–महेशात्मक आहे. केवळ शिवदैवत नाहीं. पुष्कळांचा समज "कोळेश्वर या नांवावरून हें शिवदैवत असावें असा आहे पण तो चुकीचा आहे. शिवदैवत म्हटलें म्हणजे पुढें नंदी अवश्य असतोच. तसेंच पुजारी लिंगायत असतो. व ब्राह्मण समाज प्राय: शिवस्व म्हणून नैवेद्यादि ग्रहण करीत नाहीं अशी सामान्य परंपरा रूढ आहे. पण येथील परंपरा भिन्न आहे ती अशी:– श्री कोळेश्वरापुढें नंदी नाहीं. पुजारी ब्राह्मण आहे. ब्राह्मण समाज शिवस्व नसल्यामुळें नैवेद्यादि ग्रहण करतो. तसेंच देवाच्या पूजादि समयीं–" त्रिगुणात्मक कोळेश्वर देवता प्रीत्यर्थं " असाच संकल्प करण्यांत येतो. देवाच्या आरतींत सुद्धां त्रिगुणात्मक-पर वर्णन आहे ( आरती नं. १–२ पहा ) असो. साक्षात्कार झालेल्या कोळयाचा वंशज अद्यापि समीपच्या बुरोंडी गांवीं विद्यमान आहे तो दर फाल्गुनमासीं देवाच्या होमाकरतां घराहून बली घेऊन येतो. त्यावेळीं त्याला ग्रामस्थांकडून मान मिळतो म्हणतात.

### ( ३ ) देवतेचें प्राचीनत्व

वरील प्रकार घडल्याला किती काल लोटला, कोणत्या शकांत कोणत्या मितीला घडला हें अजमाविणें फार कठीण आहे. तथापि उपलब्ध झालेल्या माहितीवरून ५०० पेक्षां अधिक वर्षे झालीं असावीं असें ठरतें. कोळथरें येथील कै. सिताराम भट्टजी जोशी नांवाच्या गृहस्थापाशीं शके १४३० चे सुमारें लिहिलेला लेखी ग्रंथ होता. त्यांतील प्रत्येक पृष्ठावर " कोळेश्वर " अशीं अक्षरें लिहिलेली होतीं. अर्थात् तत्पूर्वी बरीच वर्षे तरी हें देव-



स्थान प्रगट झालें असलें पहिजे. शिवाय भावे, बर्वे, कोल्हटकर नाम, गोमरकर, मोडक, ऋग्वेदी वासिष्ठ गोत्री दातार, कांहीं सोमण व पेठे इत्यादिकांचें हें कुलदैवत आहे. यावरूनही हें स्थान अत्यंत प्राचीन असल्याचें सिद्ध होतें.

कांहीं वर्षांपूर्वी संशोधन करीत असतां आंजर्ले येथील कै. नारायणराव निजसुरे यांजकडून कांहीं ग्रंथ आम्हांला मिळाले. त्यांत स्कंद पुराणांतर्गत परशुराम खंड वर्णनाचा पंचावन्नावा ५५ लेखी अध्याय मिळाला. त्यांत परशुरामानें स्थापन केलेल्या देव-तांचा उल्लेख आहे, तो असा—

**संस्थापयामास, तथा देवं हरिहरेश्वरम् ।**
**तथाच भैरवं देवं कोळेशं पार्वती तथा ॥**

पुढें कोकणच्या दक्षिणोत्तर सीमा सांगणारा श्लोक आहे तो असा. सहज उध्दृत करतों.

**उत्तरे कनकं नाम दक्षिणे गणनायकम् ।**
**महासरस्वती दुर्गा श्रीदेवी कालिका तथा ॥**

वरच्या श्लोकांत– श्रीहरिहरेश्वर–भैरव (कालभैरव) कोळेश व पार्वती यांची परशुरामानें स्थापना केली असे आहे. कोळेश याचा अर्थ– कोळ + ईश = कोळेश म्हणजेच कोळेश्वर असा होतो. अर्थात् याच देवाचा हा उल्लेख आहे असें गृहीत धरलें तर श्रीकोळेश्वर देवतेचें प्राचीनत्व पुराणकालापर्यंत जातें. आमचे एक इतिहास संशोधक मित्र म्हणतात– पूर्वी परकीय–परधर्मीयांच्या आक्रमणांत आपलीं हिंदूंची अनेक देवस्थानें भ्रष्ट व नष्ट झालीं. कांहीं प्रसंगीं आपल्या हिंदुधर्मीयांनींच भावनेने देवतेचें रक्षण

या दृष्टीनें कित्येक मूर्ती तळ्यामध्यें विहिरीमध्यें ठेवल्या. तर कांहीं जमिनींतही गुप्त करून ठेवल्या. पुढें थोडासा शांततेचा काल लाभताच तत्कालीन धार्मिक जनतेनें आपले देवतांची पुन्हां प्रतिष्ठा केली. तसेंच कोठें कोठें जमिनींत गुप्त करून ठेवलेल्या देवतामूर्ती कालांतरानें निमित्तप्रसंगानें उत्खनन करीत असतां उपलब्ध होऊं लागल्या. तत्कालीन जनतेनें त्यांचें रक्षण केलें अशीं अनेक उदाहरणें आहेत. त्यांतीलच हाही एक प्रकार असेल. कांहीं असो. श्रीकोळेश्वर देव प्राचीन आहे हें स्पष्ट आहे.

## (४) देवालयाचें वर्णन व सामान्य माहिती

श्रीकोळेश्वर यांचे देवालय पूर्वाभिमुख असून मुख्य वस्तीच्या बाहेर पूर्व दिशेला सपाट प्रदेशांत हवाशीर जागेवर असल्यामुळें फार रमणीय दिसतें. भोंवतालची नैसर्गिक रचना पहातांच मन क्षणभर स्वानंदमय झाल्यावांचून रहात नाहींच.

"रचना तेथील सुंदर पहातां विसरली घरदार" (पद नं. १ लें पहा) वामन बुवांनीं केलेल्या या वर्णनाचा साक्षात् अनुभव मिळतो. सर्व दिवस संसार व्याप करून त्रिविध संतापानें संतप्त झालेल्या अंतःकरणाला येथें येतांच, एक प्रकारें स्वातंत्र्य व स्वानंद सुख उपभोगावयाला मिळून क्षणभर संसार चिंता पूर्ण नष्ट होते.

**देवालयाच्या चतुःसीमा**— देवालयाचे आवाराबाहेर पूर्वेस गुरव वाडीकडे जाणारा राजरस्ता आहे. दक्षिणेस पुष्करणी नांवाचें तीर्थ आहे. पूजा, अभिषेक इत्यादिकांकरतां याच तीर्थाचें उदक आणतात. या पुष्करणी तीर्थापासून सुमारें १००–१२५ पावलांवर येथील भंडारी जातींतील श्रीमान् गृहस्थ महादेव



सखाराम मयेकर यांनी ५० वर्षांपूर्वी बांधलेलें, लहानच पण टुमदार श्रीरामाचें मंदिर आहे. या श्रीरामाचा पुजारी स्थापनेपासून वे. भिकंभटजी कर्वे हे होते. अलिकडे त्यांच्या वृद्धावस्थेमुळें त्यांचे पुतणे श्री. बळवंतराव कर्वे हे पूजा करतात. श्रीराम नवमीचा उत्सव भण्डारी समाजाकडून मोठ्या आनंदानें केला जातो, या राम मंदिरापासून पश्चिमेला सुमारें २५–५० पावलांवर श्रीमान् भिकाजी नारायण मयेकर यांनीं दिनांक ५–५–३५ ला श्रीदत्ताचें मंदिर बांधलें. सध्यां मयेकर घराणे त्याची व्यवस्था पहातें. श्रीदत्ताची पौराण प्रतिष्ठा खेडचे कै. वे. शा. सं. कमळाकर शास्त्री जोशी यांचें देखरेखी खाली झाली. श्री. केशव सिताराम जोशी हे पूजा अर्चा करतात.

देवालयाचे पश्चिमेस भातशेतीची जमीन आहे उत्तरेला ओढ्यावजा लहान नदी असून तिचे कांठावर एक धर्मशाळा व मारुतीचें देवालय आहे. धर्मशाळा सुमारें ६२ फूट लांब व २० फूट रुंद आहे. येथें यात्रेकरू, बैरागी, पांथस्थ उतरतात. ही धर्मशाळा श्री. लाटे (यांचा परिचय पुढें होईल.) यांनीं बांधली. धर्मशाळेविषयीं दुरुस्ती वगैरे करण्याचा हक्क यांचेच वंशजाचा आहे. व ते त्याप्रमाणें लक्ष देत असतात, सुमारें ५० वर्षांपूर्वी लाट्यांचे घराण्यांत विद्यमान असलेले श्री. दत्तात्रय कृष्ण लाटे नामदार 'मु. टेंभु ता. कऱ्हाड' यांनी स्वखर्चानें धर्मशाळेचा जीर्णोद्धार केला, श्री. लाटे यांचे संमतीनें कांहीं दिवस गुरव मंडळी व्यवस्था व दुरुस्ती करीत. पण तें पुढें अशक्य झाल्या-मुळें ही धर्मशाळा विद्यमान लाटे यांनीं ब्राह्मण ग्रामस्थांचे स्वाधीन केली आहे. ही धर्मशाळा पूर्वीं झाप व गवत यांनीं शिवली जात

असे व ती ब्राह्मण मंडळी स्वत: शिवत असे. असें १७८९ च्या कै. वे. त्रिंबक वासुदेव उर्फ बाबा आधारकर यांचे पत्रक नं. १ वरून दिसतें. पत्रक नं. १ मध्यें बाबा म्हणतात– "श्रीकोळेश्वर देवालयापाशी माड लावला त्याचे नारळ १४ जमा मि. शु.५ मी खर्च– या सदरांत लिहीतात– चौदा नारळांची किंमत १८२ एक रुपया दोन आणे देवालयाजवळची धर्मशाळा शिवली यावेळीं ब्राह्मण मंडळीला दिले नारळ ६ विष्णू गुरव यांजकडे सुखडी ८ ठेवल्या. त्याची किंमत १० दहा आणे. या मजकूरावरून शके १७८९ पूर्वीच धर्म शाळा बांधली होती. श्री. दत्तात्रय लाटे यांनीं जीर्णोद्धार केला त्यावेळीं नळीची कौलें होती. नंतर अलिकडे १० वर्षापूर्वी ब्राह्मण वर्गानें धर्म शाळेची पुन: दुरुस्ती करून मंगलोरी कौले घातली आहेत. याकरतां ग्रामस्थांना ७१८ शें रुपये खर्च आला. सध्यां ग्रामस्थांचे स्वाधीन असून तेच व्यवस्था पहातात. अध्दग्रही निमित्त केलेल्या अनुष्ठानाचे वेळीं या धर्म शाळेचा फारच उपयोग झाला.

**मारुति मंदिर**— घुमटीवजा लहान असून कै. दामोदर बापूजी सोमण मु, कोळथरें यांनीं १०० वर्षापूर्वी बांधलें. कांहीं दिवस त्यांचे वंशज मारुती जन्मोत्सव करीत असत. सध्यां ग्रामस्थ वर्गणी जमवून करतात. जन्मोत्सवाकरितां श्री. म, ना. जोशी, ताराबाग मुंबई यांनी वडील बंधू कै. सदाशिव नारायण जोशी यांचे नांवे देणगी म्हणून १०० रुपये दिले असून त्याचें व्याजांतून उत्सव केला जातो.

याप्रमाणें देवालयाचे बाह्य चतु:सीमांचे अवलोकन करून अंतर्भाग निरीक्षणार्थ दृष्टीप्रक्षेप करतांच देवालयाचे सभोंवार



८ फूट उंचीचा दगडी तट दृष्टीस पडतो. त्याला प्रवेश करण्याकरतां दक्षिणोत्तर दोन महादरवाजे आहेत. या महाद्वारानें प्रवेश करतांच आवारांत देवालयाचे पूर्वेस चिरेबंदी ५ फूट उंचीचा धक्का असून त्यावर **नगारखाना**, देवालयासमोर असलेले तीन **त्रिपुर, ग्रामदेवतेचें देवालय** व त्याजवळ १२ फूट लांबीचा पाण्याचा हौद असल्याचें दृष्टीस पडतें, पुढें प्रदक्षिण मार्गानें जातां दक्षिणेस श्रीविष्णूचें मंदिर लागतें. उत्तरेस श्रीगणपतीचें मंदिर आहे. या प्रमाणें आवारांतील चतु:सीमा सांगून प्रत्येकीं संक्षेपत: माहिती सांगतों.

**नगारखाना ही संस्था** अगदीं स्वतंत्र आहे. या संस्थेशीं ग्रामस्थांचा सार्वजनिक रित्या कोणत्याही प्रकारें हक्क संबंध नाहीं.

नगारखान्याची इमारत पूर्वी तृणाच्छादित होती. इमारत अत्यंत जीर्ण झाल्यामुळें मुंबई वगैरे ठिकाणीं नोकरी धंदा करणाऱ्या कांहीं ग्रामस्थ ब्राम्हण वर्गानें स्वतंत्र निधि जमवून मजबूत चिरस्थायी इमारत बांधली. या कामीं ग्रामस्थांनीं सुद्धां स्वल्प मदत केली आहे. तसेंच उपरनिर्दिष्ट हौदाजवळ एक बकुलीचा मोठा वृक्ष होता, त्याचाहि या इमारतीकडेच उपयोग झाला, असो. वरील ग्रामस्थ वर्गाने जमा केलेल्या निधींतूनच देवापुढें प्रतिदिनीं दोन वेळ चौघडा सुरू आहे. या नगारखाना संस्थेबद्दलचे सर्वाधिकार निधिसंग्राहक मंडळानें आपल्यांतीलच ट्रस्टी निवडून त्यांच्या स्वाधीन केले आहेत. या संस्थेच्या स्थापनेचा काळ शके १८०० आहे. या संस्थेंत मध्यंतरी सन १९१९ मध्यें थोडा वाद उपस्थित होऊन प्रकरण कोर्टांत गेलें होतें. पण पुढें आपसांत समजूत होऊन प्रकरण मिटलें. नंतर कांहीं वर्षे व्यवस्था

उत्तम होती. पुढें कांहीं कारणानें तूर्त निधिसंग्राहक मंडळ वि[illegible] जैन पावलें असून सध्यां जो चौघडा वाजतो तो ग्रामस्थांच[illegible] श्री. कमळाकर महाजन म्हणतात-- आमचेवडील कै. केशवरा[illegible] महाजन यांचे इच्छेनुरूप त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव (माझे बंधु[illegible] श्री. नरहर केशव महाजन हे व्यक्तिशः सध्यां व्यवस्था पहातात[illegible]

या शिवाय लाटे यांचे मार्फत फार पूर्वीपासून देवा[illegible] घुपारतीचे वेळीं चौघडा वाजविला जात असे व त्याकरतां गुर[illegible] मंडळीला प्रतिवर्षी कांहीं वेतन मिळत असे. सन १९५३ पर्य[illegible] ही व्यवस्था होती हे पुढील लाटे यांचे नं. ४ चे पत्रकावरून लक्षा[illegible] येईल.

आतां यापुढें चौघडा वाजणें कठीण दिसतें. कारण त[illegible] वर्गात परंपरागत गायन, मृदंगादिवाद्यवादन कला शिकणा[illegible] माणसें कमी होत आहेत. नवीन पिढी नोकरीकडे वळत आ[illegible]

ग्रामदेवतेचें देवालय देवीचें नांव– " **जाखाय काळकाय**[illegible] असें आहे. ग्रामदेवतेचें देवालय पूर्वी तृणाच्छादित होतें. नंत[illegible] ब्राह्मणेतरांनी ५० वर्षांपूर्वी याचा जीर्णोद्धार केला. देवाल[illegible] लहानच पण मनोहर आहे. जाखाय मातेला कौल लावून भक्तग[illegible] प्रसाद घेत असतो.

या ग्रामदेवतेसमीप असलेला पाण्याचा हौद कै. श्री. ला[illegible] यांनीं बांधला. या हौदांत येणारा पाट " **श्रीकोळेश्वर देवा**[illegible] **मालकीचा असून देवकार्यार्थच याचा उपयोग करण्यांत याव**[illegible] **देवकार्यव्यतिरिक्त पाटाचा उपयोग कोणीहि करूं नये** " यावद्द[illegible] सरकार दप्तरीं पुरावा आहे. हल्लीं पाण्याचा तुटवडा भा[illegible] लागल्यामुळें व कांहीं कारणानें पाट बंद झाल्यामुळें हौदांत पा[illegible] नसतें. पूर्वी या हौदांत कारंजें होतें. व संध्याकाळीं देवदर्शनाकर[illegible] येणारा ब्रह्मवृंद संध्योपासनेकरतां येथेंच बसत असे.



**श्री विष्णुचें मंदिर**– श्री कोळेश्वर देवालयाचा नं. २ चा विभाग ज्यांनी बांधला त्याच लाटयांनीं बांधलें असें कोणी म्हणतात. कोणी त्यांचे वंशजांनीं पुढे मागे बांधलें असावें असें म्हणतात. कारण श्री कोळेश्वराचे देवालयापेक्षां हें अर्वाचीन दिसतें. सभामंडपाकरतां उपयोगांत आणलेला दगड तांबडा आहे. व या मंदिराकरतां काळा पाषाण वापरला आहे. याप्रमाणें दोहोंच्या रचनेत भिन्नता स्पष्ट दिसते. मंदिरांत लक्ष्मीसह श्रीविष्णुची मूर्ति पूर्वी काळ्या पाषाणाची होती ती भग्न झाली. म्हणून श्री. लाटे घराण्यांतीलच वंशजाचें प्रेरणेनें शके १८१७ चैत्र वा॥ ७ रोजीं कै. वे. दामूकाका जोशी यांचे हातून नवीन मूर्तीची स्थापना झाली. याकरतां रु. १७१ आणे ९ खर्च झाल्याची नोंद मिळते, सध्यांच्या मूर्ति संगमरवरी दगडाच्या सुमारें १॥ फूट उंचीच्या सुंदर आहेत. पूजा अर्चेची व्यवस्था श्री. लाटे घराण्यांतील वंशजाचे मार्फत पूर्वीं श्री. सिताराम महादेव जोशी पहात. पश्चात् त्यांचे चिरंजीव श्री. केशव सिताराम जोशी मु. कोळथरें हे पहात असतात, अलिकडे वृद्धावस्थेमुळें व लाटे यांजकडून कांहीं उत्पन्न येत नसल्यामुळें त्यांनीं या देवालयाची सर्व व्यवस्था लाटे यांचे संमतीनें ग्रामस्थांचे स्वाधीन केली. या देवाचा उत्सव मार्गशीर्ष शु. १०–११–१२ असा तीन दिवस होतो याची व्यवस्था ग्रामस्थ ब्राह्मणवर्गच पहातो.

**श्री गणपति मंदिर**– श्री कोळेश्वराचें देवालय बांधणा-ऱ्यानेंच हें बांधलें असावें. दोन्ही इमारतींत साम्य असून श्रीकोळे-श्वर देवालया इतकेंच प्राचीन दिसतें. पूर्वी गणपतीची मूर्ति गण्ड-शिळेची अर्थात् काळ्या पाषाणाची होती. ती मध्यंतरी भग्न

झाल्यामुळें ग्रामस्थांनीं वर्गणी करून १९०७ सालीं नवीन संगम रवरी दगडाची मूर्ती आणून स्थापन केली. या विषयीं **मौजेची गोष्ट अशी–** मुंबईहून ही नवी मूर्ति आणून श्री. कै. सिताराम भटजी जोशी यांजकडे ठेवली. पुढें दोन महिन्यांनीं स्थापनेच्या शुभ दिवशीं मूर्ति वाजत गाजत समारंभानें देवालयाकडे आणावी. याकरतां श्रीदेव कोळेश्वराची पालखी न्यावी असें कांहींचें मत पडलें. श्रीदेवाची पालखी देवाच्या कामाव्यतिरिक्त देवालया बाहेर नेऊं नये अशी कांहींची भावना असल्यामुळें मतभेद झाला म्हणून निर्णयाकरतां श्रीदेव कोळेश्वराला चिठ्या टाकल्या. श्रीदेवानें आपले पालखींतून श्रीगणरायाची मूर्ति आणण्यास आज्ञा दिली. नंतर पालखींतून मोठ्या समारंभानें गणपतीची मूर्ति आणून तिची स्थापना केली. सध्यां या गणपतीचा उत्सव गुरव मंडळी ग्रामस्थांचे मदतीनें करतात. गुरव मंडळीकडे हा उत्सव कसा आला या विषयीं दंतकथा अशी—

श्रीगणपतीची नवीन मूर्ति स्थापन केल्यावर कांहींचे मनांत या देवाचा उत्सव करावा असें आलें. पण पूर्वीची आर्थिक परिस्थिती गरिबीची असल्यामुळें जमलें नाहीं, पूर्वी जालगांव (दापोली) येथें श्री. बाळबुवा नांवाचे उत्तम जुन्या पिढीचे कीर्तनकार होते. त्यांचे घरीं वामन १२ चा उत्सव होत असे त्यावेळीं कोळथरें येथील गुरव हा मृदुंग वाजवण्याकरतां जात असे. त्याचे मनांत या गणपतीचा उत्सव करण्याचें आलें त्यानें श्री. बुवांजवळ मनःसंकल्प सांगितला. परस्परांच्या स्नेहामुळें बुवांनीं विनामूल्य कीर्तन करण्याचें ठरवलें व तेव्हांपासून





गुरव जालगांवांत जाऊन त्यांचेकडील उत्सवांत पैसा न घेतां मृदंगाचें काम करी व बुवा कोळथरें येथें येऊन विनामूल्य कीर्तन करीत. याप्रमाणें उत्सवाची प्रथा सुरू झाली. ती त्याचे पश्चात् गुरव मंडळीनीं चालू ठेवली. या गणपति मंदिरा समोरच मांडव घालून उत्सव केला जातो. गणपतिमंदिरासमोर चार हाताचें मोठें कुण्ड घातलें आहे. त्यावरून येथें कांहीं तरी मोठें हवन झालें असावें असें वाटतें.

याप्रमाणें आवाराच्या चतुःसीमेंतील संक्षिप्त माहिती सांगून श्रींच्या दर्शनाकरतां देवालयांत प्रवेश करतों.

### श्रीदेव कोळेश्वर

यांचें देवालय सुमारें ६० फूट लांब व २०।२५ फूट रुंद आहे. याचे एकंदर तीन विभाग आहेत. देवालयांत प्रवेश करतांच प्रथम दिसणारा नं. १ चा विभाग म्हणजे सभामण्डप हा बावीस फूट लांब व पंचवीस फूट रुंद आहे. सभामंडपाचा उपयोग सर्वांना ज्ञात आहेच. पुढील नं. २ चा विभाग २३ फूट लांब व २२॥ फूट रुंद आहे. या नं. २ च्या विभागांत अनुष्ठानाकरतां ब्रह्मवृंद बसतो. तसेंच याच विभागाचे द्वारीं उभें राहून ब्राह्मण ब्राह्मणेतर ( अस्पृश्यांखेरीज ) दर्शन घेतात. या दारांचे वरचे बाजूला गणपतीची मूर्ती कोरलेली आहे. पालखी वगैरे सामान याच विभागांत ठेवण्यांत येतें.

नं. ३ चा विभाग ज्याला गर्भागार ( गाभारा ) म्हणतात तो १५ फूट लांब व २० फूट रुंद आहे. या विभागांत १ फूट १० इंचांच्या त्रिज्येनें वर्तुळ कल्पिलें असतां जें वर्तुळ होईल त्या वर्तुळाच्या आकाराची जांभ्या पाषाणाची स्वयंभू मूर्ति (पिण्डी)

असून पिण्डीचे सभोंवती ५ इंचाची साळुंकी आहे. प्रत्यक्ष मूर्तीस शुचिर्भूत ( सोवळे ) ब्राह्मणावांचून कोणीही स्पर्श करीत नाहीं

वर दिलेले लांबी रुंदीचे आंकडे भिंतीच्या जाडीसह दि आहेत. देवालयाची भिंत जांभ्या दगडांची ५॥ फूट जाड आ देवालयाची कल्पना छायाचित्रावरून येईल. अलिकडे शके १८७ मध्यें श्री. गोविंद धोंडो आधारकर मु. कोळथरें सध्यां मु. साय यांनीं वडिलांचें स्मरणार्थ गर्भागारांत संगमरवरी दगडा फरशी बसविली आहे. देवालयाचे छायाचित्रांत ( फोटो ) दोन माड दिसतात ते कै. श्री. त्रिंबक वासुदेव ऊर्फ बा आधारकर ( कै. विष्णू त्रिंबक आधारकर यांचे वडील ) यां लावले असून ते त्यांच्याच समक्ष लागवडीस आले होते हें पुढी आधारकर पत्रक ७ क्रमांकवरून लक्षांत येईल.

## ५ मनोरंजक इतिहास

देवालयाचे इमारतीबद्दल मनोरंजक इतिहास सांगण्य येतो तो असा:–पूर्वी देवालय झांप व तृणाच्छादित असून लहा होतें. समीपच्या पंचनदी गांवांतील जोशी घराण्यांत एक पुरु देवाचा निःसीम भक्त होऊन गेला. त्यानें देवालयाची जीर्णावस्था पाहून श्रींची अल्प सेवा करावी या हेतूने नवीन चिरस्था भव्यमंदिर भिक्षा मागून उभारावे असा संकल्प करून तत्सिध्य श्रींचें नांवाने भिक्षा मागण्यास प्रारंभ केला. ज्यांचा कुलस्वा श्री कोळेश्वर आहे व ज्यांची श्रीचरणीं पूज्य भावना आहे अशा सद्‌गृहस्थांना भेटून मनोदय कळवूं लागला. याच कोळथ गांवांतील मूळचे रहिवासी श्री. लाटे ( यांचें मूळचें उपनां भागवत ) नांवाचे गृहस्थ लष्करांत अधिकारी होते. तेथें जाऊ



यांची भेट घेऊन जोशीबुवांनीं आपला अभिप्राय सांगितला. जोशीबुवांचा सद्धेतु ऐकतांच श्रीमंतांना आनंद वाटला. तत्क्षणीं प्रसन्नान्तःकरणाने श्रीमंत लाटे म्हणाले–" जोशीबुवा, दूरदेशीं असलेल्या आम्हां अनाथांचें अन्नपाणी देऊन श्रींनीं उत्तम रक्षण केलें. तसेंच श्रीकृपेने आम्हांला चांगले दिवस दिसत आहेत. तर आम्हींच श्रींची अल्पसेवा म्हणून तें देवालय बांधतों." काय खर्च येईल ? इत्यादि प्रश्न केले; पण जोशी हे बाणेदार वृत्तीचे असल्यामुळें स्पष्टपणें म्हणाले,–" श्रीमंत, भिक्षा मागून देवालय बांधणेचा मी संकल्प केला आहे. अर्थात् मी तें कार्य करणार ! आपले घरीं भिक्षा मागण्याकरतां आलों आहे. तर इच्छेनुरुप भिक्षा घाला." नंतर श्रीमंतांनीं श्रीचे ठिकाणीं निष्ठा असल्या-मुळें कांहीं हजारांनीं रक्कम दिली. मग जोशीबुवांनीं ती रक्कम घेऊन तत्काळ कार्याला आरंभ केला. नं. ३ चा विभाग गर्भागार त्यांनीं बांधला. इमारत सर्व दगडी चिरेबंदी असून मजबूत आहे. एकंदर सर्व काम चिरस्थायी असून मनोहर आहे. याला बराच खर्च आला असावा असें तज्ज्ञांचें म्हणणें आहे.

नंतर श्रीमंत लाटे यांनीं आपण स्वतः कांहीं श्रींची सेवा करावी म्हणून पुढील सभामण्डप (नं. २ चा विभाग) देवालयाचे सभोंवार दगडी पापडी, तट व मागें उल्लेखिलेली धर्मशाळा बांधणें. तसेंच दोन मैलांवरुन दगडी चिरेबंदी पाण्याचा पाट आणणें इत्यादि कामें केलीं.

## ६ सभामण्डप विचार

पूर्व आवृत्तीमध्यें 'मनोरंजक इतिहास हें वरील प्रकरण दंतकथेवरून लिहिलें. पण आज श्री. कमलाकर दादा आधारकर

सध्या मु. झावबाची वाडी मुंबई. यांजकडून उपलब्ध झालेल्या पत्रांवरून कांहीं गोष्टींचा निर्णय करणें सुलभ झालें आहे.

पेशवे दप्तरमधील पत्रकांत झाप शाकारणीकरतां १॥ दीड रुपया खर्च दाखविला आहे त्यावरून–गर्भागार हा नं. ३ विभाग पंचनदीकर जोशांनी घुमटीसह बांधला असावा. व नंतर १७५९ चे सुमारे श्री. लाटे यानीं नं. २ विभाग बांधला. हा पुरुष शंकर नारायण किंवा शंकरचा मुलगा दादो शंकर असावा. दादो शंकर याने त्यावेळच्या सरकारकडून देवाला १०० शंभर रुपयांची नेमणूक करून घेतली अर्थात् देवस्थानकडे त्याचें लक्ष होतें व सरकारांत त्याचे वजन होतें. नंतर नं. १ चा विभाग सभामण्डप कीं ज्यावर घुमटी नाहीं तो प्रवेशकरतां प्रथमचा भाग (छाया-चित्र पहा.) हा बांधण्याचे कार्य देवाविषयीं अत्यंत श्रद्धेने परिश्रम घेणारे त्यावेळचे कोळथरें गांवातील पुढारी–कमळाकर आघारकर यांचे पणजोबा कै. त्रिंबक वासुदेव आघारकर यांनी केलें हें पुढे दिलेल्या पत्रकावरून लक्षांत येईल.

पत्रक क्रमांक १–त्रिंबक ऊर्फ बाबा आघारकर–गोविंदराव (आडनांव ओळखत नाहीं) यांस लिहितात–" आम्हीं सभा-मण्डपाचें काम करीत आहों त्यास तुम्हीं २०० दोनशें रुपये द्यावे त्यावर गोविंदराव शंभर रुपये म्हणतात. " पत्रक नं. २ मध्यें महादेवराव बर्वे कोल्हापूर येथून लिहितात–सभामण्डपाचें काम सर्वांनां आवडणारें आहे. आम्ही शंभर रुपये पोंचते करूं. काम मात्र मनपसंत झालें पाहिजे. अधिक द्यावे वाटल्यास अधिक देऊं. इ. " पत्रक नं. ३ मध्यें ४।१२।१८७४ चे पत्रांत बाबांचा मुलगा कृष्णाजी त्रिंबक म्हैसूरहून लिहितो–घर व सभामण्डप



दोन्हीं कामें एकदम करणार अहांत तशीं मात्र करूं नये... प्रथम घर नंतर सभामण्डपाचें काम करतां येईल. इ."

तात्पर्य, दंतकथा व उपलब्ध कागदपत्र यावरून तूर्त असा निर्णय करतां येतो कीं– गर्भागार घुमटीसह विभाग पंचनदीवर जोशांनीं बांधला, नंतर कांहीं दिवसांनी नं, २ चा विभाग घुमटीसह लाटे घराण्यांतील पुरुषानें बांधला व नं. १ विभाग कै. बाबा आघारकर यांनीं लोकांकडून मदत मिळवून शके १७८० ते १८०० च्या काळांत बांधला. हा विभाग मागाहुन बांधलेला स्पष्ट दिसतो. इतिहास तज्ज्ञ ह. भ. प. भार्गव बुवा भागवत, कांसे बुरंबाड, हेही अशीच माहिती सांगतात.

श्रीमंत लाटे भागवत घराणे टेंभूला सुमारें १७६७ सनमध्यें रहाण्याला गेलें तरी देवस्थानकडे ते स्वत: लक्ष देत असत. कधीं आपला कारकून पाठवून व्यवस्था पहात, देवस्थानकडे स्वामित्वासारखा आपलेपणाचा संबंध होता हें पुढें पृ. मध्यें दिलेल्या कागद पत्रावरून स्पष्ट होतें. सध्यां त्यांचे नांवानें घराचा पडका दाखविला जातो. व भागवत प्लॉट म्हणून एक शेताचा भाग ओळखला जातो, नारो नरसिंह पासून सध्याची पिढी ९, १० वी आहे. मध्यंतरी जाळपोळींत टेंभू येथील रहात्या वाड्यावर अग्नि नारायणाची कृपा झाल्यामुळें व सर्व इनामें खालसा झाल्यामुळें कऱ्हाड, पुणें इत्यादि ठिकाणीं व्यवसाया निमित्त सध्या त्यांचे वंशज रहात आहेत. पंचनदीकर जोशांचे वंशज वाईला आहेत म्हणतात. याप्रमाणें संशोधन करतां उपलब्ध झालेल्या कागद पत्रावरून जी अधिक माहिती स्पष्ट व निःसंदिग्धपणें लिहितां आली ती लिहिली. आतां सद्य:स्थिति सांगतों.

## ७ सद्य:स्थिति.

कालमानाप्रमाणें पुढें देवालयांत पाणी येऊं लागल्यामुळें शके १८३८ सालीं कोळथरें येथील गृहस्थ कै. श्री. **गजानन परशुराम भावे** यांनीं स्वखर्चानें दुरुस्ती केली. तसेंच श्री. लाटे यांनी आणलेल्या पाटाचें पाणी उन्हाळयांत बंद होत असल्या-मुळें देवालयासमीप पाण्याचा तुटवडा फारच भासूं लागला म्हणून शके १८४७ सालीं देवालयानजीक सुमारें ५० पावलांवर छत्रे पिंपळाखालीं वे. **के. सि. जोशी** मु. **कोळथरें** यांनीं लोकाश्रयावर विहीर बांधण्याचा संकल्प करून तो केसरी वगैरे वृत्तपत्रांतून प्रसिद्ध केला. या कार्याला श्रीवर निष्ठा असलेल्या ज्या उदार व्यक्तीनीं सहानुभूतिपूर्वक मदत केली त्यांत 'सोनगांव' येथील उदार गृहस्थ कै. श्री. **लक्ष्मण विनायक बर्वे.** यांचेच नांवाचा प्रथम **निर्देश** करणें अवश्य आहे. कारण त्यांची मदत न मिळती तर श्री. **जोशी** यांचा संकल्प पुरा होणें शक्यच नव्हतें. शके १८४९ सालीं **विहीरीचें** बांधकाम **पूर्ण** झालें. सध्यां या विहीरीचा सर्व ग्रामस्थांना **फार उपयोग होतो.**

तसेंच देवाचा पहिला **चांदीचा मुखवास**-मुखवटा फार जुना झाल्यामुळें नवीन करावा असें ग्रामस्थांनीं ठरवून या कामा-करतां शके १८५० सालीं श्री. "**वासुदेव** गंगाधर जोशी" यांचे अध्यक्षतेखालीं एक "**मुखवास कमेटी**" नियत करण्यांत आली. या कमिटीचे सभासद– १ भार्गव **धोंडो** आघारकर, २ महेश्वर सदाशिव दांडेकर, ३ गजानन कृष्ण कोझरेकर, ४ नरहर केशव महाजन, व ५ अनंत **भिकाजी** आघारकर असे होते.



**कमिटीनें** आपलें काम शके १८५१ कार्तिक व. ॥ ७ (ता. ८।११।२९) ला पुरें करून श्रीदेव कोळेश्वर यांचा चांदीचा **मुखवास** ग्रामस्थांचे स्वाधीन केला. कमिटीचा वृत्तांत स्वतंत्र **प्रसिद्ध** झाला आहे. एकंदर ५४४ रु. ३ आणे ९ पै खर्च आला. **मुखवासाचें** काम '**रा पंढरीनाथ बाळकृष्ण कामतेकर**' मु. **मुंबई** **कारागिराने** केलें आहे काम उत्तम झाल्याचें सदरच्या छाया**चित्रावरून** दिसून येईल. अशा तऱ्हेनें देवालयाची सुव्यवस्था रहावी, **उत्सवादि** देवकार्यें उत्तम तऱ्हेनें पार पाडावीं व अव्याहतपणें सुरू **रहावीं** म्हणून कोळथरें येथील ब्रह्मवृंद एकत्र संघटीत होऊन विचार-**विनिमय** करीत असतो. देवाचे उत्सव प्रसंगीं आरति, मंत्रपुष्प, **कीर्तनादि** कार्यक्रमांत क्वचित् प्रसंगीं पाऊस येत असल्यामुळें **त्यांत** व्यत्यय येतो. कायमची सुरक्षितता रहावी म्हणून **सभामंडपासमोरील** अंगणांत कौलें घालून कायमचा मंडप केला **आहे.** यामुळें बाहेर पाऊस असला तरी कार्यक्रम सुरक्षित होतात. **याकरतां** १५०० रु. ग्रामस्थांना खर्च आला. आज ३० वर्षें **पुजारी** विनायक सोमण हे वेतन अल्प असतांहि देवाची **सेवाचर्या** फार भक्तीनें व निष्ठेनें करतात हें त्यांस भूषण आहे.

याप्रमाणें देवालय सर्व प्रकारें सुस्थितींत राखलें हें ग्राम-**स्थांस** भूषण आहे. आतां देवालयाची सद्य:स्थिति सांगितल्यावर **आर्थिक** स्थिति व उत्सव याचे संक्षेपतः वर्णन देतों.

## ८ देणग्या

(१) देवाकडे पूजार्चेसाठीं पूर्वी १७०५ मध्यें दादो शंकर **भक्त** यांनीं सवाई माधवराव यांचेकडून १०० रु. मिळावे **म्हणून** सनद मिळविली होती हें पेशवे दप्तरवरून समजतें. लाटे **परिशिष्ट**पत्रक क्र. ३ पहा. सध्यां सरकारांतून ३५ रु. दरसाल नेमणूक **आहे**. ती कधींपासून सुरू आहे हें समजत नाहीं. सन १८२५

सालीं रा. काणे या उपनांवाचे गृहस्थास पावती आदा झाल्याची माहिती मिळते.

(२) सदर देवस्थानला सरकारांतून इनाम जमिनी श्रींचे नांवानें आहेत.

(३) कै. रामचंद्र हरी सोमण यांनीं आपली स्थावर इस्टेट श्रीकडे स्वत्वनिवृत्ति करून दिली. तसेंच श्री. लाटे यानी देवाला दागिने भांडीं पुष्कळच दिलीं होतीं त्याची नोंद मिळते. लाटे दप्तर पत्रक नं. ७ पहा.

(४) त्याचप्रमाणें माधव मोरेश्वर बडे यांनीं तळांतील आपलें भातशेतीचें उत्पन्न श्रीचे उत्सव खर्चाकरतां दिलें आहे. तसेंच इतर मिळणाऱ्या किरकोळ देणग्याहि उत्सवप्रीत्यर्थ खर्च होत असतात. देवापुढें मूळ मालक लाटे, रामदुर्गकर भावे संस्थानिक, सोनगांवचे बर्वे, व जालगांवचे जोगळेकर यांचे चार नंदादीप अहोरात्र असत. पण सध्यां संस्थानें नष्ट झालीं. इनामदारी गेली, कुळकायदा आला. यांत सर्वांचेच ऐश्वर्य संपत्ति खालसा झाल्यामुळें वरील नंदादीप बंद झाले आहेत. सांप्रत–नानासाहेब मोडक इंजिनिअर, मूळगांव पंचनदी सध्यां रहाणार मुंबई,–दादर यांचा व केशव नारायण बर्वे प्रान्त गोवा. यांचे चिरंजीव विनायक केशव बर्वे, रा. कोयनानगर सातारा यांचा असे दोन नंदादीप चालू आहेत. तसेंच लाटे, मेहेंदळे, रामदुर्गकर भावे, यांचीं नित्य अनुष्ठानें चालू होतीं तीहि परिस्थितीमुळें बंद आहेत. सध्यां कांहीं नैमित्तिक श्रावणमासासारखी अनुष्ठानें व निरनिराळ्या ठिकाणाहून येणारे कुलस्वामिभक्तजन रुद्र, लघुरुद्र, महारुद्र, यांसारखीं अनुष्ठानें प्रेमपूर्वक करीत असतात.



के १८८३ सालीं अष्टग्रहीनिमित्त फार मोठें संस्मरणीय असें तिरुद्रानुष्ठान झालें. इतिहासाचे दृष्टीनें त्याचें महत्व आहे हणून त्या अनुष्ठानाची माहिती स्वतंत्रपणें पुढें दिली आहे.

## ९ उत्सव

श्रीकोळेश्वर देवाचा उत्सव दरसाल कार्तिक शु. १० पासून ात दिवस म्हणजे कार्तिक वद्य १ पर्यंत मोठ्या थाटाने होत सतो. उत्सवांत प्रतिदिनी प्रातःकालीं पूजा, रुद्रैकादशिनी भिषेक, ग्रामस्थांच्या पूजा, नंतर महापूजा, नैवेद्य असा कार्यक्रम दिवसा असतो, रात्रीं ८ चे सुमारास आरति झाल्यावर नानाविध ाद्यांसह संस्थानच्या थाटाने श्रींची पालखींतून मिरवणूक निघते. मिरवणुकीचेवेळीं भक्तजन मोठ्या प्रेमानें पदें, अभंग, भजन हणत असतात. मधूनमधून श्रींचा जयजयकार चालू असतो. ा तऱ्हेने तीन प्रदक्षिणा पूर्ण झाल्यावर पुनः आरती होऊन मिरवणूक संपते. नंतर मंत्रपुष्प, वेदपठण, कीर्तन–प्रसाद होऊन ात्रीं सुमारें १ वाजतां कार्यक्रम पूर्ण होतो.

याप्रमाणें सात दिवस सतत उत्तरोत्तर मोठ्या प्रेमानें त्साह वृद्धिंगत होत असतो. लोकयात्राहि फार जमते.

१ टीपः–पूर्वी सातारा येथें रहाणारे (मूळ कोळथरें) श्री गोविंदराव े यांनीं देवाला पालखी दिली ती जीर्ण झाल्यामुळ कै. त्रिंबक वासुदेव र्फ बाबा आघारकर यांनीं शके १७८९ मध्यें नवी करविली त्यावेळीं ार, रंग, दांडीसुद्धां अेकूण खर्च ४० रु. आला (पत्रक नं. ६ पहा.) ालखी लहानसर, रेखीव सुंदर आहे. पुढें रंग गेल्यामुळें सुमारें वीस र्षांपूर्वी त्यांचे पणतू श्री. कमलाकर महादेव आघारकर यांनीं मुंबईहून त:च्या खर्चानें रंग पाठवून श्री. कै. काकामास्तर यांचे देखरेखीखालीं ावला.

शेवटचे दिवशीं म्हणजे कार्तिक वद्य १ ला ललितोत्सव व सांगताप्रीत्यर्थ समाराधन होतें व सर्वांना महाप्रसाद देण्यांत येतो. रात्रीं ललिताचे दिवशीं पालखीच्या ११ प्रदक्षिणा पूर्ण झाल्याव ३ चे सुमारास कीर्तन होऊन उत्सव समाप्त होतो.

या महोत्सवाखेरीज विजयादशमी व वर्षप्रतिपदा य दिवशीं पण श्रींची सर्व संभारासह मिरवणूक निघते.

तसेंच श्रावण सामवार, शिवरात्र, एकादशी या दिवशींहि भक्तजनांची मोठी गर्दी जमते. याप्रमाणें श्रीकृपेनें देवस्थान विषयक जी माहिती मिळाली तीच एकत्र करून लिहिली आहे आतां ३ वर्षांपूर्वीं झालेल्या अतिरुद्रानुष्ठानाचें इतिवृत्त देतों.

### अतिरुद्रानुष्ठान कार्यकारी मंडळ

अध्यक्ष

**श्री. कमळाकर केशव महाजन**, कोळथरें

खजिनदार

**श्री. श्रीकृष्ण गोविंद महाजन**, कोळरें

सेक्रेटरी

**श्री. अच्युत विश्वनाथ भावे**, कोळथरें
**श्री. लक्ष्मण विष्णु बिवलकर**, कोळथरें

सभासद

श्री. गजानन वासुदेव गोडबोले कोथळरें
श्री. अनंत दत्तात्रय परांजपे, कोळथरें
श्री. नरहरी केशव महाजन दादर, मुंबई
श्री. भार्गव कृष्णा गोडबोले, मुंबई
श्री. सुरेश शिवराम कोझरेकर, कोळथरें
श्री. मुरलीधर दामोदर बडे, कोळथरें
श्री. आत्माराम जनार्दन जोशी, ठाणें
श्री. अच्युत गणेश आधरकर, मुंबई
श्री. नारायण गजानन कोझरेकर, कोळथरें
श्री. कृष्णाजी विनायक सोमण, कोळथरें



## अष्टग्रही निमित्त झालेलें

# १० अतिरुद्रानुष्ठान

भारतीय ग्रहगणिता प्रो। शके १८८३ सालीं अष्टग्रही झाली. अष्टग्रही म्हणजे आठग्रह एकाराशीला एकत्र येणें. हा योग पौष वद्य ३० या दिवशीं येत होता. एका राशीला एक नक्षत्रावर पांच किंवा अधिक ग्रह एकत्र येणें हें राष्ट्रावर– देशावर येणाऱ्या आपत्तींचे, संकटांचें निदर्शक आहे.–

**महारोगभयं राष्ट्रक्षयो वृष्टिविनाशनम् ।**
**पंचग्रहसमायोगे दुर्भिक्षमरकादिकम् ।**
**अत ऊर्ध्वं महोत्पातो नाना दुःख भयाकुलम् ।**
**समायोगे ग्रहानृणां दोषान्कुर्वंति सर्वदा ॥**

**शांतिरत्ने.**

इत्यादि वर्णन शास्त्रीय ग्रंथांत आढळतें.

ज्याच्या जन्मराशि वा जन्मलग्नापासून ४, ८, १२, ५ या स्थानीं असा योग येईल त्या व्यक्तीलाहि फार मोठी आपत्ति, संकटें भोगावीं लागतात. तात्पर्य सूचित अरिष्ट निरसनार्थ राष्ट्र कल्याणार्थ, सर्वारिष्ट शांत्यर्थ– दैविकानुष्ठान करण्याची प्रवृत्ति सर्वत्र बळावली. भविष्यवादी शास्त्रज्ञानीं, पंडितानीं पुराण, प्रवचन, व्याख्यान, कीर्तन, वृत्तपत्रें इत्यादि द्वारा सर्व भारताला प्रेरणा दिली. यामुळें खडबडून जागृत झालेल्या भारतांत सर्वत्र खेड्यापाड्यांतूनहि राष्ट्रकल्याणार्थ व्यक्तिशः संघशः सर्व समाजांत आपापल्या शक्तीप्रमाणें पंथाप्रमाणें सहा महिनेपूर्वी पासूनच दैविक आराधना सुरू झाली, वृत्तपत्रांतूनहि जोराची

चालना देण्यांत आली. स्वाभाविकच कोळथरें ग्रामस्थांचे मनां
आपणहि आपले गांवांत कांहीं अनुष्ठान करावें असें आलें. श्रीदे
कोळेश्वरावर प्रतिवर्षीं महारुद्राभिषेक केला जात असे. तो सध्य
ब्राह्मणांचे अभावीं करणें अशक्य झालें आहे. अष्टग्रहीचे निमि
त्तानें अतिरुद्रानुष्ठान करावें. हा विचार गांवांतील वे. तात्य
जोशी, श्री. कमलाकर केशव महाजन वगैरेंच्या मनांत आल
पण खर्चाचा अंदाज करतां कांहीं हजाराचे आंत होणार नाह
हें समजतांच त्यांचा निरुत्साह झाला. महाजन स्वस्थ बसले
पण त्यांचे मित्र तात्या जोशी ता. २९।१०।६१ रोजीं ठाण्याल
गेले. तेथें त्यांचे बंधु वे. रा. आत्मारामभटजी जोशी यांचेपु
त्यांनीं हा विचार मांडला. देवाविषयीं असलेल्या श्रद्धेमुळें वे
आत्मारामभटजी यांस ही गोष्ट एकदम संमत झाली. आपले गांवे
श्रीदेव कोळेश्वरावर हें अनुष्ठान करावेंच असा त्यांनीं निश्चय
केला. कितिहि खर्च येवो. निष्ठा ठेवून निःस्वार्थ बुद्धिनें का
आरंभलें म्हणजे ईश्वर सहाय्य करतोच. ' नहि कल्याणकृत् कश्चित्
दुर्गतिं तात गच्छति " हा अनुभव येतोच.

खरोखर योग असा—श्रीमंत **अनंत विठ्ठल बर्वे** रा. **रखोलं
स्टेशन बापी. दमणप्रांत.** यांची व वे. आत्माराम जोशी यांची भे
झाली. त्यांत बोलतां बोलतां हा विषय निघाला. श्री. बर्वे यांच
कुलस्वामी श्रीकोळेश्वर असल्यानें कुलदेवतेची सेवा. या सद्
भावनेनें हा विचार त्यांना पसंत पडून या सत्कार्याला आप
शक्य ती जास्तीत जास्त मदत करूं असें आश्वासन देऊन त्यांनी
रकमेचा अंदाजी आंकडाहि सांगितला. यामुळें संकल्पित का
करण्यास सर्वांस उत्साह वाटला. वे. तात्या जोशी यांनीं ही गोष्







महारुद्र स्वाहाकाराचे यजमान दांपत्य.
वैदिक तिलक **श्री. केशव मोरेश्वर आघारकर.**
कोळथरें, सध्या मुंबई धसवाडी राममंदिर.

ामस्थ रा. कमलाकरपंत महाजन यांस कळविली. संकल्पित नुष्ठान हें एकट्याचें नसून–सर्वांच्या कल्याणार्थ सर्वांच्या हाय्यानें होणारें असल्यानें महाजन व जोशी यांनीं ही गोष्ट ामस्थांचे पुढें ठेवण्याचें ठरविलें. कार्तिक कृष्ण ६ सोमवार ा० २८।११।६१ रोजीं श्रीगोपाल कृष्ण मंदिरांत श्रीकोळेश्वराचे ार्षिक उत्सवाचे जमाखर्च वाचनादि कामाकरतां ग्रामस्थ एकत्र मले असतां तें कार्य संपल्यावर श्री. महाजन व जोशी यांनीं हा िषय सभेपुढें मांडला. विचारविनिमयानंतर सर्वांना हा विचार र्ण संमत होऊन या कार्याच्या सिद्धतेकरतां तत्काल कमेटी मण्यांत आली. या कमेटीनें "ठाणें, मुंबई वगैरे दूर ठिकाणीं सलेल्या ग्रामस्थांना, व हा देव ज्यांचा कुलस्वामी आहे, व ांची या देवावर श्रद्धा आहे त्यांना पत्रें पाठवून वा समक्ष भेटून ा सत्कार्याची माहिती द्यावी व अंदाज घ्यावा" अशा अर्थाचा राव होऊन सभेचें काम संपलें.

ज्यांना ज्यांना हें वृत्त समजलें त्यांनीं या कार्याला संमति ऊन आश्वासनेंहि दिलीं. यामुळें मंडळीचा उत्साह द्विगुणित ाला. अनुष्ठानाचा पूर्णपणें निर्णय घेण्याकरतां मार्गशीर्ष शु० २ के १८८३ ता. ९।१२।६१ या दिवशीं रात्रीं श्रीगोपालकृष्ण ंदिरांत ग्रामस्थांची सभा घेण्यांत आली. संपूर्ण विचारविनिमया- ंतर सभेंत एकमतानें अतिरुद्रानुष्ठान करण्याचा निर्णयात्मक राव करून तत्काल कार्यकारी मंडळ नियत करण्यांत आलें. त्या रावाचें स्वरूप असें- "अष्टग्रहीनिमित्त श्रीदेव कोळेश्वरावर तिरुद्राभिषेकानुष्ठान व महारुद्र स्वाहाकार; असें उभयविध नुष्ठान करावें. निश्चित दिवस ग्रामस्थ व मुंबईकर यांचे

विचारें अडचणी लक्षांत घेऊन ठरवावा. अनुष्ठानाकरतां विद्व ब्राह्मण निरनिराळ्या गांवांतून निमंत्रित करावे. येणाऱ्या विद्व नांची रहाणें भोजनादि व्यवस्था आपणांला करावी लागेल व करावी " अशा अर्थाचा ठराव होऊन सभेचें काम संपलें. मुंबई वगैरे ठिकाणीं पत्रव्यवहार करून, समक्ष भेटून पौष शु॥ सोमवार ( ता. ८।१।६२ ) हा शुभ दिवस **प्रारंभ दिन** म्हण मंडळानें निश्चित केला. पौष शु. २ ते पौ. शु. ९ ला अतिरुद्रा ष्ठानाभिषेकाची समाप्ति करून त्याच दिवशीं महारुद्रस्वाह करानुष्ठानाचा संकल्प–प्रारंभ करावा. पौष शु. १३ गुरुवार दुपा पूर्णाहुति वगैरे कार्यक्रम करून अनुष्ठान पूर्ण करावें. एकूण अक दिवस अनुष्ठान करावें असें सर्वांच्या संमतीनें ठरलें.

अनूष्टानाच्या मोठेपणाची कल्पना येण्याकरितां स्पष्ट करण करतों.

| | | |
|---|---|---|
| सकृदावर्तन | – | संपूर्णरुद्राध्याय १ वेळ म्हणणें. |
| एकादशिनी | – | अकरावेळ रुद्राध्याय म्हणणें. |
| लघुरुद्र | – | अकरा एकादशिन्या. |
| महारुद्र | – | अकरा लघुरुद्र, १२१ एकादशिन्य |
| अतिरुद्र | – | अकरा महारुद्र १३३१ एकादशिन |

या कोष्टकावरून अतिरुद्रानुष्ठान किती कठीण व मो आहे याची कल्पना येईल. पाच दहा ब्राह्मणांनीं ४–८ दिवसां होणारें नाहीं. अर्थात बाहेरगांवांतून ब्राह्मण आणणें आवश्य असतें. कार्य ठराविक मुदतींत व शास्त्रविहित मार्गानें होण्या करितां समीपच्या म्हणजे पंचनदी, आसूद, मुरूड, मुर्डी, आंजर्ले दाभोळ, गुहागर, भिमवणे वगैरे गांवांतून रूद्रपाठ म्हणणारे योग ब्राह्मण निमंत्रित केले.



स्वाहाकार–यज्ञकर्म यथासांग पार पाडण्याकरतां समीपच्या वातून विद्वद्वृंद आणण्याचें कामीं श्री. ल. वि. बिवलकर ळथरें, वे. आत्माराम जनार्दन जोशी रा. ठाणें, व वे. शा. सं. सुदेव शास्त्री आधारकर कोळथरें सध्यां मु. पनवेल यांनीं फार रिश्रम घेतले. सर्व ब्रह्मवृंदाची राहण्याची भोजन वगैरे सर्व रची व्यवस्था धर्मशाळेंत ( देवालयासमीप ) करण्यांत ली होती. तसेंच बाहेर गांवांतून येणाऱ्या भक्तजनांची भोज- दि योग्य ती व्यवस्था तेथेंच करण्यांत आली होती. प्रारंभा- सून अखेरपर्यंत अनुष्ठान समारंभात कोणतीहि उणीव, अडचण सूं नये, सुकरता यावी म्हणून खालील मंडळीची निवड करण्यांत ली होती.

केळीचीं पानें– श्रीकृष्ण गोविंद महाजन.
दूध, ताक– ल. वि. बिवलकर.
वर्गणीं जमविणें– ग. वा. गोडबोले, कृ. वि. सोमण, मु. दा. बडे
भाजीपाला– क. के. महाजन.
दुकानचा माल– अ. वि. भावे, क. के. महाजन; ग. वा. गोडबोले, सुरेश शि. कोझरेकर, ल. वि. बिवलकर.

| | |
|---|---|
| यज्ञ मंडपांतील व्यवस्था– | सु. शि. कोझरेकर, बंडू परांजपे |
| धर्मशाळेंतील व्यवस्था– | मु. दा. बडे |
| पाटाचे पाण्याची व्यवस्था– | दा. स. दांडेकर |
| पूजा साहित्य– | क. के. महाजन |
| हवनाकरतां लागणारें साहित्य, वस्त्र, पात्र, प्रतिमा हविर्द्रव्यादि | वे. आ. ज. जोशी, तात्या जोशी मुंबईकर मंडळीकडून |

या मंडळानें दक्ष राहून अंगीकृत काम हौसेने, भावने केल्यामुळें प्रारंभापासून समाप्तिपर्यन्त कोणतीच अव्यवस्थ बेफिकीरपणा, पदार्थांची नासधूस यापैकीं कांहींच घडलें नाह मंडळाला ग्रामस्थांनी, व मुंबईहून आलेल्या सर्व मंडळीनीं तसें आलेल्या भक्तजनांनीं कायिक वाचिक आर्थिक सर्व तऱ्हेची मदत केल्यामुळें सर्वत्र आनंद, समाधान व सुप्रसन्नता दिसत होती.

प्रारंभ दिनाचे पूर्व दिवशींच निमंत्रित ब्राम्हण उपस्थि होऊं लागले. तसेंच अनुष्ठानाचे यजमान श्री. अनंतराव ब वे. आत्माराम जनार्दन जोशी विद्यालंकार वासुदेव शास्त्र आघारकर वैदिक तिलक, केशव मोरेश्वर आघारकर, तात्य जोशी व मुंबईकर ग्रामस्थ मंडळी अनुष्ठानाकरतां मोठ्या उत्सा हानें हजर झाली.

## अनुष्ठानारंभ

पौष शु. २ सोमवार शके १८८३ हा अनुष्ठानाचा मंगल दिवस उजाडला. स्नानादि नित्यकर्म आटोपून शुचिर्भूतपणें सकाळी ७ वा. सर्व ब्रह्मवृंद श्रीकोळेश्वर मंदिरांत उपस्थित झाला ग्रामस्थ मंडळी जमली. मंगल वाद्यें वाजूं लागलीं, वेदमंत्राचे घोषांत कार्याला प्रारंभ झाला. प्रथम सर्व ग्रामस्थांनीं श्रीपुढे वडा नारळ ठेवून अंगीकृत कार्य निर्विघ्नपणें पार पडण्याकरतां श्रींची प्रार्थना केली. अतिरुद्रानुष्ठाचे यजमान श्री. अ. वि. बवे यांचे हातून अतिरुद्रानुष्टानाचा संकल्प करण्यांत येऊन गणपति पूजनादि कर्माचा प्रारंभ झाला.



**म दिवसाचा कार्यक्रम असा–**

मवार : स्टँ. टा. ७–३० ते ९ गणपतिपूजन पुण्याहवाचनादि.

प्रात: ९ ते ९–३० श्रींची पूजा.

९–३० ते १०–१५ महान्यास लघुन्यासादि.

१०–३० अतिरुद्राभिषेकास प्रारंभ.

१०–३० ते ११–३० प्रथम एक पर्याय पुरा.

११–३० ते १२ विश्रांति

१२ ते २ पर्याय दोन पुरे करून श्रींची पूजा महानैवेद्य आरति मंत्रपुष्प ब्राह्मण भोजन.

**ळवार ते रविवार नित्याचा कार्यक्रम असा—**

सकाळीं ७–३० ते ११ अभिषेक, ११ ते ११–३० विश्रांति १–३० ते १–३० पुनः अभिषेक एकूण साधारणपणें पर्याय व ब्राम्हण ५० असा क्रम असे. अतिरुद्रानुष्ठानाची एकदशिनी ल्या १३३१ दिली आहे. ती पूर्ण होऊन कांहीं एकादशिन्या षिक करण्यांत आल्या. देवाचा पाण्याचा पाट सतत चोवीस स वहात असल्यानें स्नान पानादि करण्यास कोणतीच उणीव अडचण भासली नाहीं देवावर ११ धाराचें चांदीचे भिषेक पात्र लावलें होतें. सतत पाणी आणण्याचें काम– . बाबूराव बडे, बंडू परांजपे, बंडु सोमण, याशिवाय गांवातील ानथोर ग्रामस्थ व बाहेरून आलेले भक्तजन श्रद्धेनें करीत त. सर्व कार्य नियमितपणें सुसंबद्ध चालत असल्यानें ठरल्या- णें पौष शु. ९ ला सकाळी १० वाजतां मंगलवाद्यांचें घोषांत वघोष गर्जनेंत अतिरुद्रानुष्ठानाभिषेकाची समाप्ति करण्यांत ली. एक मोठें अनुष्ठान निर्विघ्नपणें पार पडल्यामुळे सर्वांना नंद झाला.

## महारुद्र स्वाहाकर

पौष शु. ९ हाच महारुद्र स्वाहाकाराचा प्रादंभदि असल्यानें पूर्वदिवशींच ठिकठिकाणाहून आलेल्या ब्रह्मवृंदापै सव्वीस विद्वानांची स्वाहाकारानुष्ठानांत योजना करण्यांत आल या विद्वानमंडळांत वे. शा. सं. शंकरशास्त्री गाडगीळ, ठा आत्माराम ज. जोशी, कोळथरें. विद्यालंकार–वासुदेव शास आधारकर, कोळथरें, सध्यां पनवेल, विद्याविनोद–नारायणशास् जोशी आंजर्लेकर, आंजर्लें. याज्ञिकप्रवर–परशुराम भटजी शें रेवदंडा. वे. कृष्णाजी भा. वैशंपायन पंचनदी इ. प्रमुख हो देवासमोरच यज्ञमंडप सुशोभित करण्यांत आला होता. मंडपा मध्यभागीं चतुर्हस्तात्मक चतुरस्रकुंड घातलें असून त्याचेम पूर्वेला ग्रहपीठ, त्याचे उत्तरेस मुख्य देवाता रुद्रपीठ भूषि करण्यांत आलें होतें. पौष शु. ९ मी ला अभिषेकानुष्ठान समा होतांच सकाळीं १०–३० ला मंगलवाद्यांचे घोषांत वैदिकस्वस्ति मंत्रपाठपूर्वक कर्मारंभ झाला. या स्वाहाकारानुष्ठानाचें यजमान वैदिकतिलक-वे. केशव मोरेश्वर आधारकर रा. कोळथरें यां दिलें होतें. यजमान हस्तें–श्री कोळेश्वर महाराजांपुढें विडा नार ठेवून नमस्कारपूर्वक प्रार्थना करण्यांत आली. नंतर सपत्नी यजमानांना वैदिकमंत्रानें सुवासिनी हरतानें मंगलतिलक लावू संकल्पारंभ झाला. संकल्प-वे. शा. सं. शंकरशास्त्री गाडगीळ विद्याविनोद नारायणशास्त्री जोशी आंजर्लेकर यांनी समयोचि असा तयार केला. गणेशपूजनादि पूर्वांग झाल्यावर अग्निमंथ करण्याकरितां यजमानासह विद्वद्वृंद अग्निशाळेंत आला. अग्निमंथ करून अग्निसिद्ध करावयाचा असल्यामुळें हा अपूर्व समारंभ पहाण्य करतां स्त्री–पुरुष बालवृद्ध बराच समाज जमला होता



वृंदअग्निस्तुतिपर मंत्र म्हणत असतां मंथनारंभ झाला. पांच निटांत अग्निप्रादुर्भूत झाला. सर्वांना आनंद वाटला. नंतर कुंडांत अग्निची विधिपूर्वक स्थापना देवतापूजनादि होऊन नाला प्रारंभ झाला. मुख्य आचार्य–वे. शा. सं. शेंडयेशास्त्री . हवनीय द्रव्य घृताक्ततिल घेतलें होतें. कुंडासमीप सोळा ण ऋत्विज बसत. स्वाहाकाराचें आवर्तन म्हणण्याकरतां त्र ब्राह्मण असत. साधारणपणें १२–३० पर्यंत हवनाचा क्रम होऊन नंतर ब्राह्मण भोजन होत असे. नंतर रात्रीं रति, मंत्रपुष्प, वेदपठण, पालखी झाल्यावर आलेल्या विद्वानां- कोणाचें तरी समयोचित विषयावर प्रवचन व कीर्तन होऊन रण १२–३० वा. रात्रीं कार्यक्रम पूर्ण होत असे. याप्रमाणें वारपर्यंत नित्य हवनाचा कार्यक्रम चालत असे.

## पूर्णाहुति समारंभ

पौष शु. १३ गुरुवार दिवस पूर्णाहुतिसमारंभ व अनुष्ठान प्तिचा असल्यानें श्रीचें व यज्ञनारायणाचें दर्शन घेण्याकरतां वातून व समीपच्या अनेक खेडयांतून हजारों मंडळी जमली. रणपणें ११–३० ला हवनसंख्या पुरी होऊन उत्तरांग विला प्रारंभ झाला. याज्ञिक कर्म करणारा ब्रह्मवृंद, श्रद्धावान्, द्वान् व कर्म यथाविधि घडावें म्हणून दक्ष असलेले आचार्य, त्विक यजमानहि आचारशील, विद्वान्, ग्रामस्थ भावनाप्रधान विर्द्रव्यहि गोघृत व कृष्णतिल, असा सर्व योग आल्यानें प्रत्येक र्यक्रम उठावदार होत असे. पूर्णाहुति समारंभाला तर फारच कृष्ट शोभा आली होती. प्रेक्षकांची अंतःकरणें भक्तिभावानें न गेल्याचें दिसत होतें. अग्निनारायण तर शुद्ध हविर्द्रव्य

मिळाल्यानें सुप्रसन्न होऊन आपल्या मंगलज्वालानीं जणूं आ[illegible] व्यक्त करून भक्तजनाना शुभाशीर्वचन देत आहे असे वा[illegible] वसोर्धारेचेवेळीं सतत आज्यधारा पडत असतां वेदमंत्रघोष[illegible] आचार्यांनी सामगायनाला प्रारंभ केला. नंतर मंगलवाद्यघोषा[illegible] श्री कोळेश्वर महाराज की जय, या एकाच गर्जनेत पूर्णाहु[illegible] समारंभ पुरा झाला. सर्वत्र आनंद पसरला. श्रीकोळेश्वरदेवाच[illegible] कृपेनें आरंभलेलें मोठें कृत्य निर्विघ्नपणें यथाविधिपूर्ण झा[illegible] याबद्दल सर्वांनांच आनंद व कृतार्थतेचे समाधान लाभलें. सर्वा[illegible] देवाच्या कृपेनें असेच मंगल दिवस लाभोत अशी श्रीकोळेश्व[illegible] महाराजांचे चरणीं प्रार्थना केली असेल. श्रीरस्तु.

अनुष्ठान समाप्तिचे दिवशीं यज्ञनारायणाचे दर्शना[illegible] आलेल्या सर्व भक्तजनानां जातिनिरपेक्ष योग्य मर्यादानुसा[illegible] महाप्रसाद देण्याची मंडळानें उत्तम व्यवस्था केली होती. त[illegible] दिवशीं सुमारें १५०० भोजनपात्र संख्या झाली. रोज संख्[illegible] सुमारें १५० होत असे.

या प्रमाणें या अनुष्टानाची थोडा विस्तर करून माहित[illegible] देण्यांत हेतु इतकाच, जर एकाद्या भाग्यवानाला येथें वा अन्य[illegible] अशा तऱ्हेचें अनुष्ठान करण्यची प्रवृत्ति पुढें मागे झाली शक्ति[illegible] संपन्नता लाभली तर या अनुष्ठानाला खर्च किती येतो, साहित्[illegible] काय लागतें, किती ब्राह्मणांचा आवश्यकता असते, व्यवस्था क[illegible] राखावी लागते याची सामान्य कल्पना यावी ही ऐतिहासि[illegible] दृष्टि यांत ठेवली आहे. यापेक्षां अधिक माहिती कमेटीच[illegible] वृत्तांतांत मिळेल.

या कार्याकरतां एकूण ५२२९ रुपये सुमारें खर्च झाल[illegible] त्यापैकीं धार्मिक खातें या सदरातील तपशील देतों.



**धार्मिक खातें—**

| | |
|---|---|
| १३३६–०० | अतिरुद्राची ब्राह्मण दक्षिणा |
| ३८५–०० | महारुद्रस्वाहाकार दक्षिणा |
| ४५–०० | गणपति पूजनादि ऋत्विग्वरणान्त |
| २१–३७ | कलश, प्रतिमा, अग्निमंथन |
| १६–०६ | पूजासाहित्य, धूपदीपादि |
| २२–०० | भोजन दक्षिणा |
| १६–५० | मंत्रपुष्प, शुभांइन्धनें |
| १६०–०० | तूप ६४ रत्तल दर २॥ रु. प्र. |
| ५१६–४४ | तीळ २५८ किलो दर दोन रु. |
| एकूण २५१८–३७ | |

तांदूळ, डाळ, चहा साखर वगैरेचा तपशील कमेटीचे वृत्तांतात आहे तो पहावा. इत्यलम्.

# ११ जुने आधारभूत कागद पत्र.

आतांपर्यंत देवस्थानविषयक जी माहिती लिहिली त्याला आधारभूत मिळालेल्या जुन्या कागदपत्रांचा यथाक्रम संग्रह करतों.

**पत्रक नं. १–मोडक घराण्याचा इतिहास**

राणे व मोडक यांचे वादांत खालील माहिती मिळते. पृ. २०–२१

"शके १६३१ अधिक वैशाख शु॥ १३ सन १७०९ पंचनदी म्हणजे जागा राण्याचा. येथें म्हणजे आगर नव्हता तेव्हां. येथील कोळथरेस येऊन कित्येक दिवस उजरोन गेले. त्यावर पंचनदीच्या जंगलामध्यें खुटचा........गेले. खुटघाकरतां तेथें धोंडा देखिला तो उलटिला तेव्हां देव होता. त्याजवर ब्राह्मण मजकूर कोळथरें यास घरास आले. दुसरे दिवशीं कोळथरे याचे गांवकरी यास पुसलें कीं–पंचनदी जागा कोणाचा, त्यास कोळथरकर बोलले

कीं पंचनदी राणे याचा जागा. त्याचें घर कोठें आहे त्याजवर कोळथरें व गांवकरी यांनी सांगितले कीं दुमदेवास आहे. मोडक जाऊन राणे यांची भेट घेतली. इ. इ.

पुढें तक्रार अर्जांत याच पृष्ठांतील दुसरा मजकूर असा – "ऐसीयास.... करलें भाटें (रत्नागिरी) येथील मोडकांचा एक पुरुष व त्याचे बेटे तिघे मौजे कोळथरें येथे येऊन राहिले त्याजवर लांकडांस पंचनदीचे जंगलांत जात ऐसीयास एक दिवस खुटयादाखल गेले. तेव्हां एक धोंडा देखिला तो उलथून पाहिला तो देव होता. त्याजवर घरास आले. गांवकरी याजवळ कोळथरें यास पुसों लागले कीं पंचनदी गांव कोणाचा? त्याजवर गांव राणे याचा असे, म्हणून कोळथरें याचा मुकादम व गांवकरी बोलले. त्याचें घर कोठे आहे त्याजवरून राणे यांचे घरास गेले. आपला गांवामध्यें रहावयास आगर देणें इ० इ०

पुढें पृ. २४ मध्यें जबानी देताना रघुनाथ बल्लाळ मोडक म्हणतो–जाहालिगांवचा देव बहिरव चिंचवलीस. जेथें राणवाडी राणे याचें घर आहे परंतु राणे याचा आगर किंवा आगर निसबत सत्ता कांहीं नाहीं. आगराचें वडीलपण खोती महाजनकी आम्हां मोडकांची आहे. आगर नेमावले तेव्हाचे कौल, खुर्द खतें कागदपत्र आपणाजवळ होते ते राजापुरकराची स्वारी कसबे मजकुरी पडून घरें जळालीं त्यावेळीं कागदपत्रे जळालीं. त्यापैकीं एक फर्माना फारसी नक्कल हिंदवी सन तीसा खमसैन तीसा मयाचे (शके १४८०) इ. स. १५५० आधील आहे. आपले वडील कसबे मजकुराचे महाजन असतां देसाईपणाचें वतन जोडलें त्याचा दाखला सदरहु फरमानें यांत आहे. इ० इ०



वरील मजकूर देण्याचे तात्पर्य असें :– शके १४८० सन १५५० चे पूर्वीचा दाखला आपणाजवळ होता असें मोडक म्हणतो या अर्थी सन १५५० पूर्वी बरेच दिवस त्याचे पूर्वज कोळथरे येथें आले. नंतर पंचनदीला जाऊन आगरवाडी करून वसाहत केली. त्यावरून कोळथरें गांवची वसाहत ७०० वर्षापूर्वीची आहे व पंचनदी येथील आजचा ब्राम्हणवाडीचा आगर भाग नंतरची वसाहत आहे हें स्पष्ट होतें. पंचनदी येथील मोडकांचा मूळ पुरुष प्रथम कोळथरें येथें येऊन राहिले व तेथेंच त्यांचा कोळेश्वरकृपेनें उत्कर्षझाल्यानें पंचनदीचे मोडक श्रीदेव कोळेश्वर आपली कुलदेवता मानतात.

## १२ लाटे दप्तर

श्रीदेवस्थानशीं ज्यांचा निकट संबंध आहे त्या श्री. लाटे-भागवत-इनामदार यांचेविषयीं पुढीलप्रमाणें माहिती मिळते. "नारो नरसी (नरसिंह) उपनाम भागवत गोत्र कपि सूत्र आश्वलायन ऋग्वेदी सभासद दिल्लीहून औरंजेब बादशाह चालून आले ते समयीं किल्ला सातारा व विशाळगड यांस वेढे पडले त्यासमयीं आपण स्वामीसेवा एकनिष्ठपणें केली. अर्थ सविस्तर महाराज स्वामी कैलासस्वामी हिंगणे यांचे मुक्कामीं विदित केला. इ० इ० (विश्वव्यापी वैदिक संस्कृति आचवल कृत पृ. १२५)

नरसोपंत यांचे पुढील पुरुषहि सरकारांत सैन्यामध्यें होते. हे राहणारे कोथळरें- हें कोरेगांव इनाम मिळाल्याचे सनदीवरून स्पष्ट होते- ती सनद अस्सलवरून नक्कल–लाटे दप्तर प. नं. १ जुमा आई सितेन मया अलफ–सन अंदाजे १७५७ "माधवराव

गोविंद उपनाम भागवत गोत्र कपि सूत्र आश्वलायन वास्तव्य मौजे कोळथरें सुभा दाभोळ प्रांत सुवर्णदुर्ग – गोविंद नारायण यासी कऱ्हाडचे मुक्कामीं फौजसुध्दां ठेविले त्याजवर अच्युतराव व नरसिंगराव पागे राजश्री पंतप्रधान हे चालून आले युद्धतुंबळ झाले. युद्धांत गोविंद नारायण यास पट्टयाच्या जखमा लागोन साहेब कामास आले यास्तव त्यांचे चिरंजीव माधवराव गोविंद यांचें चालवणें आवश्यक म्हणून कोरेगांव इनाम दिला. इ.

**लाटे दप्पर पत्रक नं. २ टेंभू गांवाबद्दलची सनद नक्कल नं. १८२५० –**कमिशन H राजश्री देशाधिकारी व सुभालेखक कऱ्हाड जि. सातारा प्रांत श्रीनिवास गंगाधर प्रतिनिधि आशीर्वाद नमस्कार.

सुहूर सन आई सितेन मया अल.फ

राजश्री शंकरजी नारायण. राजश्री गोविंद नारायण व वेदमूर्ति गणेशभट बिन नारायण भट उपनाम भागवत गोत्र कपि सूत्र आश्वलायन वास्तव्य मौजे कोळथरें पंचनदी सुभा दाभोळ प्रांत सुवर्णदुर्ग यांनी पुरातत स्वामीचें सेवक. एकनिष्ठपणें स्वामी-सेवा केली राज्यांत कस्त मेहनत केली. आणि गणेशभट भागवत दशग्रंथी ब्राम्हण थोर म्हणून यांस टेंभू गांव इनाम दिला." यावरून टेंभू गांव इनाम मिळाल्यावर लाटे भागवत टेंभूला राहण्यास गेले तथापि त्यांचे कोळथरें येथें जाणें येणें असे, देव-स्थानची व्यवस्था ते स्वतः पहात. त्यांचे पश्चात् वंशजहि स्वतः अगर कारकुना मार्फत देवस्थानची व्यवस्था पहात. देवस्थानचें



[उत्प]न्न वाढविण्याकरतां खटपट करीत. शंकरजी नारायणाचा [दुस]रा मुलगा दादो शंकर भागवत यानें श्रीकोळेश्वर देवाला [स]रकारांतून ४२॥ साडे बेचाळीस रुपये मिळत ते शंभर मिळावे [म्ह]णून त्यावेळच्या पेशवे सरकारकडे विनंति केली ती मान्य [क]रण्यांत येऊन देवस्थानला शंभर रुपये देण्याबद्दल आज्ञा कर-ण्यांत आली हें खालील पेशवे दप्तर मधील उताऱ्यावरून लक्षांत [ये]ईल.

**[पेश]वे दप्तर–दक्षिण कोंकण**

रुमाल ६५४ श्री देव कोळेश्वर शके १७०५

श्री देव कोळेश्वर मौजे कोळथरें तर्फ पंचनदी तो॥. सुवर्ण-[द]ुर्ग यास पूजा नैवेद्याची वगैरे नेमणूक पेशजी तो॥. मजकूरपैकीं [स]रकारांतून आहे. त्याशिवाय जाजती नेमणूक करून दिली [पा]हिजे. म्हणोन दादो शंकर भागवत यांनीं हुजूर विनंती केली [त्य]ावरून श्री चे पूजा नैवेद्य, नंदादीप वगैरे नेमणूक–

रुपये ४२॥ साडे बेचाळीस पेशजीची पूर्वीची नेमणूक

(याचा तपशील असा)

[श्री]चे नैवेद्याबद्दल वगैरे नेमणूक
[नै]वेद्यास थैली वजन पक्के
.॥. भात ८।५ तेल
दीपास
८॥. दाल ८८१॥ तूप
नैवेद्यास
.॥. ॥ .।६॥
१५ नक्त पुजारे यास रु. १०

श्रावणमासाभिषेकाची नेमणूक
नक्त ब्राम्हणास दक्षिणा रु. ५
गल्ला थैली तूप वजन
८२।१ भात ८८४८१५
८८१॥ दाल २ नारळ
५०० विडयाची पानें
झांप शाकारणीस
सुमारें १५०

( मागील पानावरुन जमाखर्चाचा तपशील )

अभिषेक दक्षिणा ५

२७ ॥ नक्त ऐन जिनसाची
किंमत.

१७ ।–॥ भात ॥। = ।१ खंडी
२० रु. प्रमाणें
१॥। = दाल ४॥१॥ द
४।१ प्रमाणें

१९४ ≡ ॥

वजनी वजन पक्कें एकूण रुपये
३ तेल ४१५ दर ४४
प्रमाणें रुपये
२॥। = तूप ४४५॥१५ द
४४५ प्रमाणें
५॥। =
सुपारी सुमारें प्रमाणें
४–॥ नारळ दोन
२। झाप १५० दर १॥
४– पानें विड्याची ५००
दर रुपयास सुमारें
१०००० प्रमाणें
२। = ॥

४२ ॥ पूर्वीची नेमणूक
+ ५७ ॥ साल मजकूर पासोन

४० ॥। देवाचे पूजेचे ब्राम्हणास

सालिना १० ॥। दररोज रु. ४६ प्रमाणें
टक्के ४५॥६
सरासरी टक्के ४।
३० भोजन खर्च दरमहा
२॥ प्रमाणें

एकूण
१००



( मागील पानावरून जमाखर्चाचा तपशील )

५ । = देवास दक्षिणा दररोज
टक्के ३ प्रमाणें.
टक्के २२॥ दर सरा-
सरासरी ४। प्रमाणें.
२ ॥ चंदन
१ ॥ कापूर
१ । देवास विड्याची पानें
सुपारी मिळून
६४ = तेल नंदादीपास दररोज
वजन पक्के ४४।९ प्रो.

सालिना वजन पक्कें ४१४५॥९ पैकीं पेशजीचे नेमणूकेंत आले. ४४१५ वजन बाको वजन ४॥।.॥९

एकूण १०० शंभर रुपये पैकीं पेशजीचे नेमणूकीते साडे बेचाळीस जाजती (जास्त) साल मजकूर पासोन ५७॥ साडे सत्तावन करार करून देऊन हे सनद सादर केली असे. तरी सदरहु प्रो. दरसाल तो. मजकुर पैकीं पोंचवीत जाणे म्हणोन मोरो बापूजी गोसावी यांचे नांवें–

सनद १ रसानगी यादी

वरील सनद प्रमाणें श्री देवाला शंभर रुपये सालिना नेमणूक झाली ती कोठपर्यंत चालू होती व केव्हां कमी झाली हें समजत नाहीं. सध्यां ३५ रु. येतात.

याच मजकुराचा कागद– श्री गोविंद दत्तात्रेय लाटे यांचे संग्रहांत मिळाला असून त्यांत प्रारंभीचा मजकूर असा–

" अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री मोरो बापोजी गोसावी यांसी सेवक माधव नारायण प्रधान. नमस्कार.

सांप्रत विद्यमान– श्री. गोविंद दत्तात्रेय लाटे-भागवत इनामदार मुक्काम कऱ्हाड, मंगळवार पेठ घ. नं. ४६

यांचे संग्रहातील कागद पत्रावरून– शिवगांव ता. खेड, रत्नागिरी या इनाम गांवचे उत्पन्न देवस्थानच्या विविध कार्याकडे खर्च केलें जात असे. या विषयीं सन १८९४ते १८९९ या पांच वर्षांचें जमा खर्चाचें टांचण मिळालें. त्यावरून पुष्कळ गोष्टींचा बोध होत असल्यानें तें देतों. मुखत्यार काणे नांवच्या गृहस्थाचें जमाखर्चाचें टांचण

**लाटे दप्तर–पत्रक नंबर४–१८९४ ते १८९९ पर्यंत**

| | | |
|---|---|---|
| शिवगांवाबद्दल जमा दरसाल खेड ट्रेझरींतून रु. २५९ आणे १४ पै ४ येत असत. | १७१८९ | श्री लक्ष्मीनारायणाचे मूर्तीची स्थापना झाली त्यावेळीं खर्च झाला तो मि. चै. व. ७ शके १८१७. |
| | १५० | श्री कोळेश्वर देवाचे शिवरात्रीचे खर्चाबद्दल प्रत्येक वर्षी रु. ३० प्रमाणें दिले. |



( जमाखर्चाचा तपशील )

| | |
|---|---|
| ८० | श्री देव कोळेश्वराचे नंदादीपाबद्दल प्रतिवर्षी १६ प्रमाणें |
| ३०० | सिताराम महादेव जोशी कोळथरे यांजला देवावर दररोज अनुष्ठान करण्याबद्दल दर वर्षी ६० प्रमाणें. |
| २७५ | श्री देव कोळेश्वराचे देवाजवळ धुपारतीचे वेळीं वाजविण्यास गुरव यांस |
| ६ | महाविष्णूचे वस्त्राबद्दल दरवर्षी १ प्र. |
| १४ | श्री कोळथरे धर्मशाळेचे रिपेरी बद्दल. |
| ३॥ | किरकोळ खर्च–शिवरात्री संबंधी महागाई मुळें फाजील खर्च म्हणून. |

अलीकडे ९–१० वर्षे ट्रेझरींतून पैसे येण्याचें बंद झाल्यामुळें सध्या या देणग्या व खर्च करतां येत नाहीं. यामुळें लाटे यांचे वैयक्तिक अभिषेक, नंदादीप वगैरे कार्यक्रम बंद आहेत. सन १९५६ पर्यंत चालू होते तेथ पर्यंतच्या पावत्या लाटे यांच्या दप्तरात आहेत. त्या पुढीलप्रमाणें–

**पत्रक नंबर ५**

गुरव यांस प्रत्येकीं दरसाल २५ रु. पोंच झाली.
शिवराम बाळकृष्ण मालगुंडकर गुरव मु. कोळथरें ता. १८।२।५३
नारलिंग रामलिंग गुरव मु. कोळथरें ता. १।३।५३
परशुलिंग बार्बलिंग मालगुंडकर गुरव मु. कोळथरें ता. १४।२।५३

केशव सिताराम जोशी ५० नंदादीपाबद्दल.
पूजेबद्दल ७०
व शिवरात्रीबद्दल ३२ शिवरात्रीला महारुद्राभिषेकहोत असे. त्याकरतां. ता. १।३।५३

**लाटे दप्तर पत्रक नं. ६**

नगारखान्याजवळ बाग होती. त्याची व्यवस्था लाटे यांचे वतीनें कांहीं दिवस गुरव पहात.

कृष्णराव गोविंद लाटे यांसी–गोविंदलिंग वगैरे गुरव यांचे रामराम. विशेष. आपलें पत्र पोंचलें. मजकूर समजला. तुम्ही लिहून पाठविलेला मजकूर त्याचा तपशील असा–तुमच्या लिहिण्याप्रों।. बागेची व्यवस्था त्रिवर्ग असामी आम्हीं चांगली ठेवली आहे. यापुढेहि ठेवूं. तुमचेकडील ब्राह्मण यांस पूजेकरतां देवळांत फुलें ठेवित जाऊं. धर्मशाळेची दुरुस्ती गुदस्तसालीं स्वत: लाटीन काकुबाईनें केली आमचा संबध नव्हता. आंता दुरुस्तीकरतां दहा रुपये पाठवून द्यावे म्हणजे धर्म शाळेची दुरुस्ती करूं. रुपये न आल्यास आम्हास सामर्थ नाहीं, बाकी झाडलोट आम्ही करीत असतो. पाटांत घाण आम्हीं करीत नाहीं. कोंड्या गुरव घालतो आम्हीं सांगितलेलें ऐकत नाहीं. नगारखान्याजवळील फुलझाडें यांची व्यवस्था गुदस्तसाली आलेल्या यजमानाचे अनुमतीनें आम्हीं केली होती. इ. इ. फा. शु. ३ (शक नाहीं) सध्यां बाग वगैरे काहीं नाहीं, धर्मशाळा पाट वगैरे यांची व्यवस्था विद्यमान लाटे घराण्यांतील पुरुषानें ग्रामस्थांचे स्वाधीन केली असून ग्रामस्थ ब्राम्हण वर्गच सर्व व्यवस्था उत्तम ठेवीत आहे.



**लाटे दप्तर** पत्रक नं. ७ दागिन्यांची यादी–

रघुनाथराव, गोविंदराव महादेव व भास्कर चिंतामण लाटे मु. कोळथरें शके १७६१ विरोधी नामसंवत्सरे फा. शु. ७ तसलमात बाळंबटजी मेहेंदळे मु. मजकूर–

देवाचे पितळी दागिने येकार्ती १, तीर्थाची पंचपात्री लहान १, समया थोर दोन, निरांजन १, तबक १

तांब्याचे दागिने (भांडीं) १ ताम्हन, १ तपेलें थोरलें, लहान १ तपेलें १, परात, एक पोंहोरा, ३ हांडे (१ कल्हईचा, १ पाण्याचा, १ पाणी तापविण्याचा १ ओगराळें)

**लोखंडी दागिने**–कुदळ, दिवा, विळी.

**रुप्याचे दागिने**–१ ताट २ थोरल्या वाटचा १ लोटी एक तबक १ अलकार्ति ५ वाटचा (१ लहान ४ मोठचा पंचामृताच्या १ अभिषेकपात्र १ देवाच्या करंड्याचें झांकण, १ चौरीचा दांडा २ मोर्चेलचे दांडे.

**मोत्यांचे दागिने**– १ तुरा सबंध सर तेरा मोतीं सुमारें ४१७ शिरपेंच सबंध ४ खडे नाहींत. ३ कुडक्या, एक मोत्याचा जोड, लहान कुड्याचा जोड.

१ विष्णूची बिंदली सोन्याची, जोड. १ नथ लहान (लक्ष्मीची) १ तुऱ्याचा सोन्याचा दांड, पोंवळ्याची माळ-पोवळी सुमारें ७०.

**लाकडी व दगडी दागिने**–जातें, पाटा व मोडके ५ पाट, –देव्हारा मोडकांनी खर्चून फळ्या बसवून दिल्या आहेत एक फळ्यांची चौकट, १ पोळपाट. या प्रमाणें देवाचें सामान बाळंभट मेहेंदळे यांचे हवालीं असे. या प्रमाणें १०० वर्षांपूर्वीची नोंद मिळते.

**श्री. कमलाकर दादा आधारकर कोळथरें यांचे संग्रहांतील**

## देवस्थानविषयक जुने कागदपत्र

**श्री. लाटे:** भागवत यांचे पश्चात् देवस्थानच्या कार्यांत कै. श्री. **त्रिंबक वासुदेव आघारकर** हे फार लक्ष घालीत असत. हे फार विद्वान होते. सांगली, मिरज, जमखिंडी वगैरे भागांत जाऊन देवाविषयीं लोकांचे मनांत श्रद्धा व भावना उत्पन्न करून देवाकरतां विविध प्रकारें मदत मिळवून आणीत. त्यांचा व्यवहार चोख असे. स्वतःच्या संसारांतील तसेंच देवस्थानचे कारभारांतील बारीक सारीक गोष्टी लिहून ठेवल्या आहेत. सभा मण्डप प्रवेश करतांच नं. १ चा विभाग त्यांनी बांधला असें मागे लिहिलें त्याला आधारभूत असलेले कागदपत्र प्रथम देतों:–

मूळ सर्व कागदपत्र मोडी लिपीत आहेत त्याची बालबोध लिपींत नक्कल– अस्सलवरून–

**सभामण्डप पत्रक नं. १—**

राजमान्य राजश्री त्रिंबकपंत दादा आघारकर मु. कोळथरें यांस सा. नमस्कार विनंति. येथील क्षेम तागायत आषाढ शु. ६ रविवार पावेतों वर्तमान उत्तम असे वि॥ तुम्हांकडून ज्येष्ठ.... पत्र आलें त्यांत श्रीकोळेश्वराचे सभामंडपाचें काम करीत आहों त्यास तुम्हीं दोनशें रुपये द्यावे,श्रीदेवाचे सभामंडपाचें काम करीत असाल तर तें तयार झाल्यावर शंभर रुपये आम्हीं देऊं. जास्ती मिळणार नाहीं व अगोदरहि मिळावयाचें नाहीं. काम पुरें झाल्यावर देण्याचें चिरंजीव माधवराव यांजकडून लिहून आलें आहे. कळावे बहुत काय लिहिणें. हे वि.

—*गोविं*

**सभामण्डप पत्रक नं. २—**

राजश्री त्रिंबक भटजी आघारकर मु. कोळथरें. स्वामीचे सेवेशीं कृतानेक सा. नमस्कार विनंति येथील कुशल ता. मि.॥ श्रावण शु. ८ मी. पावेतों मुक्काम श्रीक्षेत्र करवीर येथें क्षेम असौ. आषाढ व॥ १ चें पत्र आलेलें पोंचलें. त्यांत श्रीचे सभा-मंडपाचें काम आपण करणार हा मजकूर पाहून संतोष झाला. त्या कामास कांहीं मदत करूं. असें बाबांनीं आपणास पत्र पाठविलें आहेच त्याप्रो. आम्हीं शंभर रुपये कोणी स्नेहीमार्फत पोंचते करूं. काममात्र आपण लौकर तयार करावें. सर्वांस आवडणारें आहे, यामुळे श्रीची प्रेरणा लोकांच्या मनांत होऊन पैशाब॥ साहाय्य करतील. यासाठीं अवकाश करूं नये. तयार झाल्यावर आणखी जास्त नजरेस आल्यास आम्हीं कांहीं देण्याची तजवीज करूं, काम चांगलें पसंत मात्र व्हावें. सुरू केल्यावर आम्हांस लिहुन पाठवावें. काम कसें कसें चाललें आहे त्याजबद्दल फुरसुतीने कळवावे कळावें. लोभ पूर्ण असावा ही विनंति.

—*महादेव बर्वे*

**पत्रक नं. ३—**

कृष्णाजी त्रिंबक आघारकर, मु, कसबे, ताडसुड तो. होनावली जि. तुमकूर, म्हैसूर, ता. ४।१२।१८७४ च्या पत्रांत वडिलांना लिहितो—

आपण घर व श्रीकोळेश्वराचा सभामण्डप दोन्ही कामें एकदम करणार अहां तर्शी मात्र करूं नये. कारण प्रथम एक काम पुरें झाल्यावर दुसरे कामास प्रारंभ करावा, अगोदर करूं नये. घराचा करारनामा सुरू केल्यास तो पुरा झाल्याशिवाय सभामंडपाचें काम सुरू करूं नये. म्हणजे धांदल होणार नाहीं. याकरतां प्रथम घराचें काम नंतर सभामण्डप करतां येईल इ. इ.

सही मोडी-*कृष्णाजी त्रिंबक आघारकर*

## सभामण्डप व इतर कामासाठी मिळालेल्या
# देणग्या—टांचण

**पत्रक नं. ४—**

यादी-श्रीकोळेश्वर वास्तव्य कोळवरें तर्फ पंचनदी तो. सुवर्णदुर्ग, या देवास नवस व चौरी, देणगी यजमानानीं सांगितली आहे. चै. शु. ११ शके १७८० कालशुभनाम संवत्सरे.

१ रावसाहेब भावे रा. रामदुर्ग यानीं पुत्र झाला म्हणजे सभामंडपास रुपये ५०० व देवास पालखी व अबदागीर देऊं.

२ बाळासो. नरगुंदवाले भावे हे पूर्ववत् जाग्यावर येऊन काम पाहूं लागल्यास श्रीस पालखी अबदागीर व पूर्वी अनुष्ठान होते तसें आम्हांस सांगण्याचा करार स्वामीचार्य आचारी यांनी—ग्रामस्तमिळोन देवासीं अर्ज करावा. याप्रो. सांगितलें.



३ मुद्गलचा राम घोरपडे हे याचे स्वाधीन राज्याचा कारभार पूर्वी होता त्याप्रमाणें जाहला म्हणजे ( सभा मण्डपास ) पांचशें रुपये देऊं. याप्रमाणें करार त्यांचे आश्रित बापुजी यांनी केला आहे. याशिवाय दूर दूरच्या लोकांची श्रीदेवावर कशी श्रद्धा होती व बाबा आघारकर हे देवाकरतां किती खटपट करीत. –देवा विषयीं भावनां उत्पन्न करीत हें लक्षांत येण्याकरतां इतिहासाचे दृष्टीनें थोडें महत्त्व असल्यानें कांहीं नामनिर्देश करतों.

४ आप्पा सा।. पटवर्धन रा. जमखिंडी हे पूर्ववत् जाग्यावर येऊन कारभार त्यांचे हातून चालू झाल्यास श्रीस पालखी व अबदागीर व कांहीं चारी सांगुं याप्रमाणें अण्णासाहेब पटवर्धन यानीं करार केला आहे.

५ केशव साठे नवलगुंद यानी श्रीस नवस करावयास सांगितला कीं उभयतांच्या प्रकृतिस समाधान जाहलें म्हणजे दहा रुपये देण्याचा करार केला. याप्रमाणें अर्ज केला. याप्रमाणें तेथील दिनकरपंत साठे यानीं मुलाला गुण पडल्यास रुपये दहा देण्याचा करार केला आहे.

६ कृष्णा जोशी पंचनदीकर रा. वाई यानीं श्रीस नवस सांगितला. आमचे मनाप्रमाणें कार्यसिद्धि जाहली म्हणजे श्रीस पालखी देऊं.

७ दाजीबा कोल्हटकर रा. पांडवगल्ली.
भास्करपंत भावे, मिरज
केशवभट फडके, हरिपूर
वासुदेवपंत भावे, रामदुर्ग
आबा कोल्हटकर, मिरज यांनी देवास श्रावणमासीं दर सोमवार अनुष्टान सांगितले.

८ नाना सोमण वडदकर रा. करंजाली ( दाभोळखाडी ) बाबाजी सोमण वडदकर-करंजाली यानीं श्रीस कांहीं चारी सांगितली.

९ बाबाजीपंत व कोंडोपंत ओक रा. बदलापूर यांनी आपले कोळथरें येथील आगराचे स्वामित्वाबद्दल श्रावणमासीं चार एकादशिम्या सांगितल्या. याप्रो.। बाबा आघारकर हे देवाविषयीं श्रद्धा वाढवून देवाकार्याकरतां मदत मिळवीत.

**पत्रक नं ५**

स्मरणार्थ टांचण शके १७८० ज्ये. शु. १० ५ रुपये अब्दागीर. अबदागीरास मोत्यें २

चिमापायास.... श्री कोळेश्वरास पालखी करावयास दिली त्याचा करार तबकडी, दांडी रंग सुद्धां तयार करून द्यावी आणि रुपये २५ पंचवीस द्यावे याप्रो।. बयाना रोख रु. एक वासुदेवपंत बर्वे यांचे विद्यमानें दिला. अश्विनशु.

**पत्रक नं. ६**

टांचण जमाखर्च शके १७८६.

४० रुपये श्री कोळेश्वरास पालखी नवी करवली त्याचे खर्चास लागले. सुतार रंग. सुद्धां दांडी नवी करवली. ३ रु. श्री कोळेश्वराचे उत्सांहांत तीन साल साखर वाटली. १ श्रीदेवीचे उत्साहांत व गोकुळा ८ मीचे दिवशीं साखर वांटली १ नाना सोमण यांनी वरचे गणपतीच्या देवालयाचा जीर्णोद्धार केला त्यास रोख. ( यावरून वरच्या गणपतीच्या देवालयाचे जीर्णोद्धाराचा काल समजतो. )



**पत्रक नं. ७**

शके १७८९ जमाखर्च टांचण

| जमा | खर्च |
|---|---|
| १८।। श्री कोळेश्वराचे देवालया जवळ माड खुद्द मी लावला आहे. त्याचे नारळ फोडून देवास घासून काढणें. पाणी देवावर घालणें यामाडावर कोणाचाहि हक्क सबंध नाहीं· शके १७८० चै. शु. १ | .। ≡।। देवालयाजवळ धर्मशाळा शिवली त्यावेळेस ब्राम्हण मंडळी यांस दिले नारळ ६ |
| | .।। =।। विसु गुरव यांजकडे सुखडी ठेविल्या. नारळ ८ |
| | ।।। = श्री कोळेश्वराचे देवालयाजवळ पिंपळाची मुलांडी काढून चिरे बसविण्यास कामकर ४ मजुरदार केले वै. शु. ७ |
| | १ देवाच्या कळशा नव्या करवल्या त्यास पट्टी दिली. |

शंभरवर्षांपूर्वी देवाची आर्थिक परिस्थिति किती कठीण होती. उत्साहाकरतां कर्जहि काढावें लागे. याविषयींचे १टांचण मिळालें तें देतों.

**पत्रक न. ८—** शके १७६४

वे. रा. विनायक भट खांबेटे. स्वामीचे सेवेशीं रा. त्रिंबक वासुदेव आघारकर रा. मौजे कोळथरें. सा. न. वि. आम्हीं श्रीधर भट सोमण या पासून पंचवीस रुपये घेऊन श्रीकोळेश्वराचे उत्साहाकडे खर्च केले त्यास तुम्हांस जामीन दिलें आहे. त्यांस आम्हीं व्याजसुद्धां मुदतीप्रो. देऊं. यांत अंतर करणार नाहीं. तुम्हांस छापी लिहून दोन महिन्यांत करून देईन. हा कागद छापावयास जो खर्च येईल तो आम्ही करूं. कळावें. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति.

शुभकृन्नाम संवत्सरे कार्तिक शु. १३ शके १७६४ दस्तुर खुद्द

सही–*त्रिंबक वासुदेव आघारकर*

## याच वर्षीचा उत्साहाचा जमाखर्च

### पत्रक नं. ९--शके १७६४ शुभकृत्नाम सवत्सरे

| जमा रुपये | | खर्च रुपये | |
|---|---|---|---|
| १४ | भात कैली .।।। =।। | ८ | हरिदास यांस बिदागी |
| ८ | नाना गोमरकर | १।। | गुरव मृदंगी |
| ४ | महादु तेली | १ | दिव्यास तेल |
| २५ | सावकार याचे कडून कर्ज घेतलें ( श्रीधरभट सोमण याजकडून ) | १ | हरदास यांचा भोजन खर्च |
| ५१ | | .।।. | नारळ, सुपारी, गणसपुजा ( नारळ फोडून त्याचे बारीक तुकडे केले जातात त्यास गणसपुजा म्हणण्याची इकडे पद्धत आहे. ) |
| | | ३ | तांदूळ कैली ८१।। |
| | | १।। | नांव ओळखत नाही उपाध्य यास |
| | | .।।. | डाळ तुरीची |
| | | .।।. | कांकडे |
| | | १।. | किरकोळ सामान. |
| | | १६ | साखर वजन |
| | | ३ | हरभरे ८१।। |
| | | १० | तूप |
| | | .।।।. | गडी मजुरी |
| | | १।। | शेताचा दस्त |
| | | १ | गुरव यास पोट खर्च |
| | | ५१ | |

**या टांचणाखालीं कांहीं ग्रामस्थांची नांवें आहेत. सहज देतों--**

श्रीधरभट सोमण
विनायकभट खांबेटे
महादेव जोशी



( मागील पानावरून जमाखर्च पुढें चालू )

बापुभट बडे
दादा सोमण
मोरोपंत बडे
महादेव खांबेटे
रघुनाथ खांबेटे
बाळाजीपंत बडे
नाना आघारकर
रावजी महाजन
रामचंद्र आघारकर
बाळ महाजन
भास्कर पंतबडे
बाळ आघारकर
नाना कोझरेकर
बापु जोशी
बाळाजीपंत सोमण
बाबा करवे
नाना करवे
अनंतभट परांजपे
विश्वनाथभट दातार

या खर्चामध्यें पुरणपोळीची गांव समाराधना, हरिदास, गुरव यांची संभावना, शेताचा दस्त यांतच आहे, समारधनेच्या तांदुळांची नोंद यांत नाहीं,

या टांचणावरून शंभर वर्षा-पूर्वीची धान्य, मजुरी इत्यादी वस्तूंच्या स्वस्ताईची कल्पना येईल. सांप्रत याचे दसपट खर्च करूनहि उत्सव तोटयांत येतो,

चिंतोपंत दाजी दातार
जनार्दन बाळकृष्ण सोमण
शंकर जोशी
महादेवभट भावे
हरभट सोमण
तात्या आघारकर
मोतीराम

पुढील दोन तीन नांवें ओळखत नाहींत.

आतां श्रींचे चमत्कार -- परिशिष्टवजा स्वल्प माहिती सांप्रदायिक आरत्या, अभंग, पदें इत्यादि पुढें देत आहें.

## १३ देवाचे प्राचीन व अर्वाचीन चमत्कार

[ माझे मित्र वे. नारायणशास्त्री जोशी यांनीं हें चमत्कार प्रकरण लिहिण्याची विनंती केल्यावरून मी यथाशक्ति ही

कुलस्वामीची सेवा करीत आहें. – वा. शि. कोल्हटकर ]

देवालय हा गुरांचा गोठा नसून हें एक हिंदूंचें अत्यंत प्रवित्र स्थान आहे. अर्थात या ठिकाणीं प्राचीन परंपरेनुसार जितके पावित्र्य रक्षण करतां येईल तितकें रक्षण करणें चांगलें. देवता या अत्यंत पवित्र स्थानींच वास करतात. पावित्र्यरक्षणाचें तेज कांहीं विशेष आहे. ज्या ज्या देवस्थानांतून अशा तऱ्हेचें पावित्र्य रक्षण केलें जातें, त्या त्या देवता साक्षात्कारदायिनी असल्याचें प्रत्ययास येतें. याचें उदाहरण प्रत्यक्ष "श्री देव कोळेश्वर" हेंच असल्यामुळे तद्विषयक कांहीं चमत्कार देतों.

१ मुसलमानी अमदानीचा काळ, अर्थात तत्कालिन हिंदूंची व देवस्थानांची स्थिती काय वर्णावी? आज या गांवावर हल्ला करावा, तर उद्यां दुसऱ्या गांवांत लुटालूट करावी, जाळपोळ करावी, व देवालयें मोडावीं, असा नित्यक्रम चालू असे. गुंडांची धाड आपणांवर केव्हां येणार हें निश्चित नसल्यामुळे लोक नेहमीं त्रस्त असत ; अशा अंदाधुंदीच्या काळांतील गोष्ट : –

एकदां या कोळथरें गांवावर गुंडांनीं हल्ला केला. हल्ला परतविण्याचें सामर्थ्य अंगांत नसल्यामुळें लोक फार भयभीत झाले. इकडे या टोळीनें हातांत नंग्या समशेरी घेऊन घरें, देवालयें उध्वस्त करण्याला आरंभ केला. श्री बापेश्वराचें[1] देवालय भ्रष्ट करून सुप्रसिद्ध असलेलें श्रीकोळेश्वर देवस्थान भ्रष्ट करण्याच्या हेतूने गुंडांनीं तिकडे धांव घेतली. ग्रामस्थ तर अत्यंत भयग्रस्त होऊन श्रीकोळेश्वरापुढें – 'देवा, धांवा, आपणच या संकटापासून रक्षण करण्यास समर्थ आहांत,' अशी प्रार्थना करूं लागले. इतक्यांत तेही लोक देवालयांत घुसले. हें पाहून कित्येक

१ भ्रष्ट केलेली देवाची पिंडी बापेश्वर देवालयाचेच पाठीमागें आहे.



चांदीचा नवा मुखवास.

कर्तव्यदक्षलोक प्राणावर उदार होऊन प्रतिकार करण्यास सज्ज झाले. पण श्रीभगवंतांनीं निराळाच विचार केला. तो चमत्कार असा :–

हल्लीं देवालयाचे पाठीमागें जेथें पारिजातकाचा वृक्ष आहे, तेथेंच पूर्वी अश्वत्थवृक्ष होता. त्यातून एकाएकीं भुंगे उत्पन्न होऊन ते यवनावर तुटून पडले. बापेश्वराचे मंदिर भ्रष्ट केलें तसाच प्रकार येथेंहि स्वैरपणें करतां येईल व भरपूर लूट मिळेल, या आशेनें लुटारूंनीं भुंग्यांकडे दुर्लक्ष केलें. परंतु मोठमोठ्या वृक्षांना पोंखरून टाकणाऱ्या त्या भुंग्यांनीं आपल्या प्रखर सामर्थ्याचे प्रहार करून यवनांना "अल्ला" ची आठवण करून दिली व त्यांना रक्तबंबाळ केलें.

एकहि पाऊल पुढें पडेना, जावें तिकडे भुंगे, पहावें तिकडे भुंगे, आणि रहावें तिकडेहि भुंगेच! शेवटीं नाइलाज होऊन दुष्ट गुंडांनीं पळ काढिला. जातां जातां कांहीं मूर्खांनीं "काफरांच्या देवळांतील सांपडेल तेंच न्यावें" या हेतूनें समोरच असलेला गंधाचा एक भला मोठा शाण[1] पळविला. भुंगे पाठलाग करीतच होते. त्यामुळें गुंडांना दुसऱ्या कोणालाहि उपद्रव देण्यास सवडच नव्हती. धांवत पळत कसें तरी आल्यामार्गानें पळून जावें, म्हणून ते सर्व समुद्रकिनारीं आले व आपल्या गलबतावर चढले. भुंगे होतेच.

देवाच्या मनांत त्यांना योग्य शिक्षा करावयाची होती. सहाण वाल्यांनीं सहाण गलबतांत ठेवतांच चमत्कार झाला तो असाः–

१ शाण – सहाण – स्त्रण असे पृथक् पृथक शद्ब – एकाच वस्तूबद्दल देशभेदानें व्यवहृत आहेत ; त्यांत 'शाण' हाच शद्ब शुद्ध संस्कृत पुल्लिंगी असून याचेच हे स्त्रीलिंगी अपभ्रंश होत.

जहाज गरगर फिरून तें जोरानें हेलकावे खाऊं लागून बुडण्याच्या पंथास लागलें. हा प्रकार काय असावा हें कोणाच्याही ध्यानीं येईना. शेवटीं सहाणेबद्दल शंका येऊन "यें काफरोंका सैतान हैं" असें म्हणत त्यांनीं ती किनाऱ्यावर आणून टाकिली. ती सहाण सांप्रत देवालयांत प्रवेश करतांच नं. १ च्या भागांत समोरच दिसते. सध्यां हिचा उपयोग करीत नाहींत.

**तुका म्हणे आम्हां भय काय करी । अमुचा कैवारी नारायण ।।**

२ देवस्थानच्या दिवाबत्तीची व्यवस्था पाहणारा एक गुरव षष्टी पूजन (प्रसूतीनंतर ६ वे दिवशीं केलें जाणारें) प्रसंगीं रात्रीं भोजन करून तसाच दिवाबत्ती पाहण्याकरतां देवालयांत शिरला. गर्भागारांत (गाभारा) पाय ठेवला तोंच पाऊल तेथून हालेना. बिचारा गुरव अत्यंत भयभीत झाला. पायाला कांहीं गार, गार, लागलें म्हणून खालीं पहातों तोंच--'सीदन्ति ममगात्राणि मुखं च परिशुष्यति' अशी स्थिति झाली. एका भयंकर सर्पानें पायाला वेढा घातला होता. थोड्याच कालांत शुद्धीवर येऊन श्रीकोळेश्वराची करुणा भाकिली. तेव्हां तो संकटांतून मुक्त झाला. त्या दिवसापासून तो गुरव आपल्या पावित्र्यास फार जपूं लागला. (देवाचा सर्प शुभ्र वर्णाचा असून तो क्वचित्प्रसंगींच दृष्टीस पडतो.) असें सांगतात.

३ शके १८२५ चे सुमारें रत्नागिरी जिल्ह्यांत दाभोळ ते बाणकोट खाडीपर्यन्त भयंकर टोळ आले होते. शेती व बागायत यांवरच उपजीविका करणारांस टोळधाड म्हणजे प्राणांतिक संकटच. त्या काळची तिकडील लोकांची स्थिति फारच कठीण झाली होती. याचें गमक म्हणजे त्यावेळीं सरकारनें लोकांस करहि माफ केला होता, हें होय.



आपत्तींत निश्चयानें सहाय्य करणाऱ्या देवतेचें सान्निध्य ज्यांना लाभलें, त्यांचें भाग्य काय वर्णावें? टोळांच्या झुंडी ज्या झाडावर बसत त्या झाडाचीं सर्व पानें झांकून जात व थोड्याच काळांत झाडावर शिरांचें जाळें पसरलेलें दिसे. हे लाखो टोळ अशाच तऱ्हेनें शेतीचा बागायतीचा नाश करीत आहेत हें पाहून 'कोळेश्वरा, धांव, म्हणत सर्व लोक कोळेश्वर देवालयाकडे जाऊं लागले. एकत्र जमून सर्व ग्रामस्थांनीं अंतःकरणपूर्वक प्रार्थना केली व सद्‌गतित कंठानें श्रींची करुणा भाकली. भयकृत् भयनाशन परमात्म्याला दया येतांच काय अवकाश! लोक प्रार्थना करून देवालयाबाहेर आले मात्र इतक्यांत आकाशामध्यें 'कुइक् मार्च' चा हुकूम सुटलेल्या फलटणीचा देखावा दिसूं लागला. सर्वांच्या देखत त्या सर्व भक्षक टोळांनीं रस्ता धरला. दोन घटकांपर्यंत भर दिवसा सूर्यदर्शन होईना. सर्व आकाश टोळांनीं व्यापून गेले. चार घटिकांनी तर गांवांत औषधालाहि टोळ राहिला नाहीं. अशा तऱ्हेनें शलभास्त्राचें निवारण झालें व लोक सुखी झाले. हा प्रकार ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिला ते लोक अद्यापि कोळथरें गांवांत जीवंत आहेत. त्यांनां त्याचें स्मरण झालें म्हणजे त्यांचे अंगावर रोमांच उभे राहातात व श्रींच्या अलौकिक सामर्थ्याबद्दल विश्वास उत्पन्न होतो. असो. आश्चर्य हेंच कीं,-- आसपासच्या गांवांना हा त्रास सुमारें २ महिने भोगावा लागला पण कोळथरें गांव मात्र श्रीकोळेश्वर कृपेनें या त्रासांतून मुक्त झाला.

**'अहं त्वा सर्व पापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः'**

हें भगवद्‌वाक्य सत्य आहे यांत शंका नाहीं.

४ कांहीं वर्षांपूर्वी कोळथरें येथील मराठी शाळा दुरुस्त

करावयाची होती. अर्थात मुलांना दुसऱ्या कोठें तरी बसविणें अवश्य होतें. मुख्य शिक्षकाच्या मनांत आलें कीं, देवाची धर्मशाळा रिकामी आहे तेथें चार दिवस मुलांना बसवावें. पुढें त्याप्रमाणें धर्मशाळेंत मुलें बसविण्यांत आलीं.

चमत्कार असा कीं– एका घटिकेपूर्वी स्वच्छ असलेली धर्मशाळा पिसवा व गोचिडांनीं भरून गेली व त्यांनीं शिक्षकांसह मुलांच्या अंगावर चढून त्यांस उपद्रव करण्यास सुरवात केली. अखेर निरुपायास्तव शिक्षकांना मुलांसह धर्मशाळा सोडणें भाग पडलें. या चमत्काराचें रहस्य 'देवाच्या पवित्र जागेंत सर्व जातींचीं मुलें बसविलीं व त्यामुळें भ्रष्टाकार झाला.' असें सांगतात.

५ देवस्थानाच्या स्थावरजंगम संपत्तीवर स्वार्थबुद्धीनें पापदृष्टि टाकल्यामुळें कोर्टांत जाण्याचे प्रसंग सर्वत्र पाहाण्यांत येतात. त्यांतीलच हा एक प्रकार आहे. अगदीं नवीन म्हणजे १५ वर्षांतील गोष्ट. एकदां श्रीकोळेश्वर देवस्थानासंबंधी कांहीं कारणामुळें कोर्टांत वाद सुरू झाला. त्या वादांत एका ब्राह्मणेतर गृहस्थानें निःशंक मनानें देवाविरुद्ध खोटी साक्ष दिली. चमत्कार असा–तत्काळ तो गृहस्थ तेथेंच कोर्टांत दृष्टिहीन झाला व त्याला कोर्टांतून बाहेर पडणें दुसऱ्याच्या मदतीवांचून अशक्य झालें. विचार करतां हा देवाचाच कोप असावा हें त्याच्या लक्षांत आलें.

मग काय विचारावें ? तत्क्षणीं श्रींपुढें लोटांगण घालून त्यानें क्षमा मागितली. नवल हें कीं, तो गृहस्थ अशा रीतीनें निरहंकार वृत्तीनें श्रींना शरण गेल्यामुळें औषधावाचून १५ दिवसांत त्याचे नेत्र पुनः पूर्ववत् झाले. तेव्हांपासून आजपर्यंत हा गृहस्थ दररोज स्नान करून देवदर्शन घेतल्याविना अन्न ग्रहण करीत नाहीं. खोटी साक्ष देणारा गृहस्थ जीवंत असून ही गोष्ट तो स्वतः सांगतो. तात्पर्य, दृष्टांताचे चमत्काराचे प्रकार दोन. एक अनुग्रहात्मक व दुसरा जागृतिजनक. उपासनादि द्वारा परमेश्वराला संतुष्ट केलें असतां पहिल्या प्रकाराचा दृष्टांत होतो. हा साधकाला अत्यंत आनंददायक व हितकारक आणि शांति प्राप्त करून देणारा आहे. व दुसऱ्या प्रकारचा दृष्टांत हा कर्तव्यभ्रष्ट, अविवेकी अशा जनांच्या उद्धारार्थ त्यांच्या पूर्वपुण्याईनें होत असतो. श्रीकोळेश्वराचे असे प्राचीन व्यक्तिगत दृष्टांत अनेक आहेत. परंतु ते सर्व येथें देतां येणें शक्य नाहीं, एक देतो माझे वडील बंधु लक्ष्मण नारायण जोशी यांची श्रीदेवकोळेश्वरावर फारच भक्ति होती. ते मुंबईला भाऊच्या धक्यावर कारकून होते. दरवर्षी उत्सवांत लागणाऱ्या उपयुक्त वस्तु पाठवित असत. सन १९३७ मध्ये श्रीकोळेश्वरदेवाचे उत्साहांत दर्शनार्थ सहकुटुंब आले. त्याना मुलगा नव्हता. म्हणून त्यांनी श्रीकोळेश्वरमहाराजांना नवस केला कीं मुलगा झाला म्हणजे पालखीबरोबर पुढें शोभणारा अबदागीर नवा देईन. भक्तेच्छापूर्ण करणाऱ्या भगवंतानें कृपा केली. पुढील सालीं मुलगा झाला. सर्वांना आनंद झाला. पण दैवगति विचित्र, नवस फेडण्यापूर्वीच मृत्यूनें गळ्यांत माळ घातली. अपूर्ण राहिलेला नवस त्यांचे इच्छेनुसार माझेबंधू सदाशिव नारायण जोशी व मी दोघांनीं ग्रामस्थांच्या संमतिनें नवा अबदागीर घेऊन दिला. देव भक्तकाम पूर्ण करणारा आहे इतकेच दाखवायचें आहे. आतां देवाचे दर्शनाकरितां येणाऱ्या कोणाहि मनुष्याला सांप्रत पाहाता येण्यासारखा श्रींचा जो विशेष आहे तोच सांगतो.



६ देवाचे मस्तकांतून नित्य गंगा प्रगट होत असते. तसेंच अभिषेकसमयीं सिंहनाद होतो. याशिवाय फा. शु. १५ होळीचे

दिवशीं प्रज्वलित अग्नीवरून चालणें इत्यादि गोष्टी आज अनुभवाला येतात.

## गंगा व सिंहनाद यांविषयीं विचार

श्रीकोळेश्वराचे मस्तकांतून नित्य जी गंगा वहाते ती एखाद्या झऱ्याप्रमाणें वहात नसून कोळेश्वराचे अंगावर जीं छिद्रे आहेत तीं उदकानें पूर्ण भरतात हीं छिद्रें देवाचे अंगाला जो नांगर लागला त्या वेळचीं आहेत. असें म्हणतात.

या गंगेसंबंधीं सहजच कोणी अशी शंका घेतात कीं, 'अहो, ही गंगा नव्हे. या प्रकारचे लहानमोठे झरे अनेक ठिकाणीं असतात. पाणथळ जमिनींत असे प्रकार नेहमींच दिसतात. आतां देवाच्या अंगावर झरा आहे म्हणून याला गंगा असें भोळे लोक म्हणत असतील यापेक्षां विशेष आम्हांला वाटत नाहीं.

प्रथमदर्शनीं हें म्हणणें बरोबर असें दिसतें पण तें बरोबर नाहीं. कारण ही जागा पाणवट नाहीं. देवालयाच्या आसमंतात असलेली भातशेती केवळ वर्षाऋतूवरच अवलंबून आहे. ग्रीष्मऋतूमध्यें तर त्या जमिनीच्या रुक्षतेकडे पाहावतहि नाहीं. इतकेच नव्हे तर त्या दिवसांत देवाच्या समीप उदकबिन्दु मिळणेंहि कठीण होतें. व त्यामुळें देवाच्या पूजेकरितां लांबून पाणी आणावें लागतें. नवल हेच कीं, अशा स्थितींत गंगा आहे तशीच आहे. पावसाळ्यांत वाढत नाहीं अगर उन्हाळ्यांत कमी होत नाहीं. यावरून हा प्रकार ' जमीन पाणवट असल्यामुळें घडत असेल ' असें म्हणणें निराधार ठरतें हें वाचकांच्या ध्यानीं येईलच. प्रत्यक्ष पाहण्यानें तर खात्री पटेल. आणि मग ' यांत कांहीं विशेष नाहीं. ' असें जें वाटतें त्यांतच कांहीं तरी विशेष आहे असें वाटेल. शिवाय या



आक्षेपाला श्रीकोळेश्वरानींही उत्तर दिलें आहे, तें येथें देणें उचित असल्यामुळें देतों.

अवघ्या पंधरा वर्षांपूर्वीची गोष्ट. बदलापूर येथें रहाणारे ओक आडनांवाचे एक सद्गृहस्थ शिवरात्रीनिमित्त कोळथरें येथें आले असतां, या गंगेसंबंधी त्यांनाही स्वाभाविकपणें शंका उत्पन्न झाली. व ' हा प्रकार काय आहे ' हें प्रत्यक्ष पहावें असें त्यानीं ठरविलें. चौकशी करितां ' पहांटेच्या वेळीं देवाला स्नान घालण्यापूर्वीं जा, म्हणजे तुमची गंगेविषयींची खात्री होईल, असें ग्रामस्थांनीं सांगितलें. त्याप्रमाणें ते स्नान करून पुरोहितास देवाच्या गाभाऱ्यांत गेले. देवावर अर्थात्च कोणीही पाणी घातलेलें नव्हतें. पुढें त्यांना मस्तकांतील गंगा दाखविण्यांत आली व त्यांनींही ती बारकाईनें पाहिली. तेव्हां ते म्हणाले—' अहो, हें छिद्रांत साचलेलें कालचें पाणी असेल. पुरोहित म्हणाले—रावसाहेब दररोज दोन प्रहरीं महापूजेच्या वेळीं सर्व छिद्रांतून वस्त्र घालून पाणी नाहींसें करण्यांत येतें. परंतु दुसऱ्या दिवशीं पुनः पूर्ववत् उत्पन्न होतें. असें आम्हीं कित्येक वर्षें पहात आहोंत. आमच्या वाडवडिलांनींहि अनेक संशय घेऊन याचा प्रत्यय घेतला आहे तेव्हां येथें शंकेला जागा नाहीं.

रावसाहेब त्यावर कांहींच बोलले नाहींत. 'काय आहे कोण जाणें. अशा वृत्तीनें त्यांनीं संध्येच्या पळीनें छिद्रांतील तीर्थ घ्यावयाचें ठरविलें. पण पाहतात तों निराळाच प्रकार. सर्व छिद्रें कोरडीं झालीं. इतका वेळ उद्कानें भरून गेलेलीं छिद्रें आपल्या डोळ्यादेखत कोरडीं झालीं. आंत उदकाचा बिन्दुहि नाहीं हें पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. अखेर पश्चात्तापानें परितप्त होऊन

अज्ञानानें झालेल्या प्रकाराबद्दल प्रार्थना करून देवाला एकमनानें शरण गेले.

या सुधारणेच्या आणि संशोधनाच्या काळांत अद्यापि किती तरी अशा गोष्टी आहेत कीं 'ज्यांची कारणमीमांसा अजून कोणालाहि लागली नाहीं.'

श्रीकोळेश्वराच्या सिंहनादाचा प्रकार हा त्यांतीलच एक नमुना आहे. अभिषेक सुरू असतां सिंहनाद अनेक वेळां ऐकण्याचा लाभ घडतो. हा सिंहनाद म्हणजे गांव दणाणून सोडणारा सिंहासारखा नाद नव्हे. तर कांहींसा भ्रमर गुंजारवासारखा गंभीर व मंजुळ ध्वनि आहे. हा ऐकू येऊं लागला म्हणजे कांहीं नवीन माणसांस आश्चर्य वाटतें परंतु अनुभवी व ज्ञात्या जनाला आनंद होतो.

कित्येक जागृत देवस्थानांतून असा नाद येतो. विशेषतः शंकराच्या स्थानांसंबंधीं हा चमत्कार पुष्कळ ठिकाणीं होत असल्याचें ऐकण्यांत येतें. आणि त्याचमुळें या गोष्टीची चर्चाही पुष्कळ ठिकाणीं होते.

अशा चर्चेमध्यें या चमत्कारासंबंधी एक आक्षेप ठरलेला आहे. तो असा— " सिंहनाद ज्या ज्या ठिकाणीं होतात त्या त्या ठिकाणांची भौगोलिक आणि भूगर्भांतील रचनाच अशा कांहीं स्वरुपाची असते कीं, तेथें पाणी पडलें म्हणजे तें जमिनींत प्रवेश करितांना असा नाद होतो. " " अभिषेकाचे वेळीं म्हणजे पाणी पडत असतांनाच हा चमत्कार होतो " या मुद्यावरही त्यांचा भर असतो. या आक्षेपाचें पुढीलप्रमाणें समाधान करतां येईल.



आक्षेपक विशिष्ट प्रकारची भौगोलिक रचना असतां तसा नाद ऐकू येऊं शकतो असें म्हणतात; पण त्याला पुरावा म्हणून अमुक प्रकारच्या विशिष्ट भौगोलिक रचनेमुळेंच तसा ध्वनि होतो असें प्रत्यक्ष प्रयोगानें दाखवीत नाहींत. त्याला पुरावा म्हणून जर ते दुसरें एकादें असेंच देवस्थान दाखवितील तर आमच्या म्हणण्याप्रमाणें तोही चमत्कारच असल्यामुळें त्यायोग आम्हांला पुष्टीच मिळेल. कदाचित् असेंही गृहीत धरलें कीं भौगोलिक रचनेनेंही असा ध्वनि येतो. तरीही दैवी चमत्कारानें असें कां होऊं नये ? याला उत्तर नाहीं, शिवाय, श्रीकोळेश्वरा-सारख्या जागृत देवस्थानांचे वर लिहिलेल्याप्रमाणें अनेक साक्षात्कार लक्षांत घेतले तर शंकेला जागाच उरत नाहीं.

आमचा प्रत्यक्ष अनुभव तर असा आहे कीं, कधीं कधीं अभिषेकाला सुरवात होते न होते तोंच सिंहनाद ऐकू येऊं लागतो; तर याच्या अगदीं उलट म्हणजे एकादे वेळी शंभर घागरी पाणी घातलें तथापि सिंहनाद उत्पन्न होत नाहीं. याचें कारण शंकाकार सांगूं शकतील काय ? तात्पर्य, चिकित्सक बुद्धीच्या आटोक्यांत आल्या नाहींत अशा कित्येक गोष्टी ईश्वरी सृष्टींत आहेत व असूं शकतात. व त्यामुळेंच आपल्या अत्यल्प ज्ञानाच्या कसोटीला दैवी चमत्कार आग्रहानें लावून पहाणें वेडेपणाचें ठरतें.

आतां श्रीकोळेश्वराच्या साक्षात्काराबद्दल समर्थ वाणीनें उत्तर द्यावयाचें तर तें असें:— **हें तो आहे सप्रचीत । आणि तुज वाटेना प्रचीत । तरी साक्षात्कारें नेमस्त ।** प्रत्ययो पहावा । ( ३२।७।६ ) **वेर्थ संशयाचा देव । वेर्थ संशयाचा भाव । वेर्थ संशयाचा स्वभाव । सर्व कांहीं ॥** २१।१०।५ इतकें लिहून प्रकरण पुरें करितों.

**वा. शि. कोल्हटकर**

# परिशिष्ट १ लें.

## कोळथरें गांवाची प्राचीन रचना.

कोळथरें हा गांव फार जुना आहे. गांवाची वसाहत कोणी वसविली हें समजत नाहीं. सांपत्तिक रचनेपेक्षां पूर्वीची रचना फार निराळी होती व तीच या परिशिष्टांत देत आहें.

सांप्रतचा ब्राह्मण-वस्ती असलेला बराचसा भाग खाजण म्हणून होता. या खाजणासमीप कोळी, भण्डारी, मुसलमान हे लोक रहात असावे. आतां त्यांत कोळ्यांची वस्ती पुष्कळ होती हें कोळथरें या नांवावरूनच सिद्ध होतें. मूळ कोळी + थारा, कोळ + थरां, कोळथरें हा अपभ्रंशानुक्रम समजावा. पूर्वीं श्री. कोळेश्वर देवस्थानाचा भागहि खाजण असून तेथें भरतीचें पाणी फार येत असलें पाहिजे. सांप्रत देवालयाचे समीप प्रायः १०० पावलांवर भरती येते. व २५-३० वर्षांपूर्वी याच ठिकाणी गलबतें येत होतीं असें वृद्ध सांगतात. याच प्रत्यक्ष प्रमाणावरून आम्हीं 'देवस्थानाचा भाग खाजण असावा' असें अनुमान केलें आहे.

या आमच्या वरील अनुमानावरूनच एक सन्मित्र म्हणतात —" आमच्या मतें हें देवस्थान शेतात नांगर चालू असतां प्रगट झालें नसून होडीचा नांगर टाकीत असतां प्रगट झालें असावें. याला प्रमाणें अशीं :——

१ पूर्वीं हें खाजण होतें. सांप्रत देवस्थानानजीक १०० पावलांवर भरती येते. अवघ्या ४०-५० वर्षांपूर्वी तेथें गलबतें उभीं रहात असत. यावरून प्राचीन काळीं तेथें समुद्र बराच पुढें होता.

२ गांवच्या उत्पत्तींत कोळी + थारा म्हणजे "कोळ्यांचें थाऱ्याचें ठिकाण" असें आहे. अर्थात हे कोळी कोंकणच्या इतर



कोळ्यांप्रमाणेंच मच्छीमारीचा धंदा करणारेच होत. शेतकरी असते तर समुद्रांत थारा करून रहाते ना. शिवाय, कोळी शेतकरी असल्याचें इतिहास सांगत नाहीं. अर्थात हा नांगर होडीचाच असला पाहिजे. कालांतरानें समुद्र मागें गेल्यामुळें येथें शेत झालें, म्हणून नांगर याचा अर्थ शेतीचा नांगर असा झाला असावा,

तात्पर्य, देवाचे उत्पत्तिविषयक दंतकथेंत- 'कोळी, नांगर व पाणी' हीं विश्वासनीय मानून तर्क करायचा तर असा करतां येईल कीं,- " भरतीच्या वेळीं पाणी भरल्यानंतर आपला मच्छीमारीचा धंदा करण्याकरतां कोळी होडींतून फिरत असतां त्या होडीच्या नांगराला रक्त लागलें. " इ. ' वाचकांनीं याचा विचार करावा. मात्र विचार करतां आपण ७०० वर्षांच्या कालाकडे पहात आहों, हें स्मरण ठेवावें. '

## पूर्व वसाहत

कोळेश्वरदेवालयाच्या समीपच्या डोंगराचे पायथ्याशीं ओढ्याचे कांठीं ब्राह्मण कुटुंबांपैकीं भागवत (हल्लींचे लाटे) व बर्वे यांचीं ५-७ घरें आणि गांवच्या उत्तर टोकाला वरच्या गणपतीसमीप सावित्रीवडाजवळ[1] दातार, पेठे, सोमण शिवाय बापये, बाम, दातार, गोधरकर, बडे, छत्रे, खांबटे, कोल्हटकर इत्यादि जुनीं घराणीं होतीं. हीं कुटुंबें भरभराटींत होतीं. बापेश्वर, वरचा गणपति, व कोळेश्वर हीं फार जुनीं स्थानें होत. कोणी दुर्गादेवी असल्याचें सांगतात.

## मौजेची गोष्ट

वरच्या गणपतीबद्दल आख्यायिका सांगतात ती अशी :- हल्लीं ज्या ठिकाणीं गणपति आहे हा जीर्णोद्धार होय. वर उल्लेखिलेल्या सावित्रीवडाजवळ असलेल्या ओढ्याकांठीं या

१ हा वड अद्याप जिवंत आहे. या वडाखालीं बसून सावित्री म्हणण्याचा पूर्व प्रघात होता. म्हणून या वडाला सावित्रीवड असें म्हणतात.

गणरायांची स्वारी होती, पुढें कालांतरानें सोमण यांच्या घराण्यांतील एका पुरुषाचे स्वप्नांत येऊन या गणपतीनें सांगितलें कीं, "मी ओढयांत वहात आहें. माझी अन्य स्थलीं स्थापना करा.आणि तुम्ही आपलें घरीं भाद्रपद शुद्ध चतुर्थीला पार्थिव गणपति आणूं नका. माझें पूजन करा. इ." नंतर त्या पुरुषाने हल्लींच्या जागीं स्थापना केली. तेव्हांपासून या गणपतीला '**सोमणांचा गणपति**' असें म्हणतात. या सोमण-घराण्यांत अद्यापि भाद्रपद शुद्ध चतुर्थीला पार्थिव गणपति न आणतां याचाच उत्सव करण्याची परंपरा आहे.

या देवालयाचा जीर्णोद्धार शके १७८६ सालीं नानासोमण यानीं केला. त्यानंतर शके १८८१ मध्यें पुनः जीर्णोद्धार करण्यांत आला याला सुमारें ११०० रुपये खर्च आला त्यांत प्रभाकर विष्णु सोमण यानें पत्नी स्मरणार्थ ४०० रु. दिले.

# परिशिष्ट २ रें

## आघारीकर – आघारकर – आघरकर

कोळथरें गांवांत सध्या आघारकर–आघरकर या उपनांवांचीं जीं घरणीं दिसतात तीं सर्व मूळचीं 'दातार' ( ऋग्वेदी वासिष्ट गोत्री ) उपनांवांचीं होतीं. **दातारांचे आघारीकर** कसे झाले याबद्दल इतिहास सांगण्यांत येतो असा:–

सरदार आंग्रे यांचे मनांत श्रीकोळेश्वराचें दर्शन घ्यावें असें आलें. त्यावेळीं त्यांचा मुक्काम दाभोळच्या समीप असलेल्या 'अंजनवेली' गांवांत होता. तेथून कोळथरें गांवांत कांहीं पुढा-यांना 'अमुक' दिवशीं आपण श्रीचे दर्शनाला येणार असल्याचें कळविलें. अंजनवेलीच्या उत्तरेस सुमारें ५-६ कोसांवर कोळथरें



गांव आहे तेथें येण्याकरितां ठरल्या दिवशीं सरदारांची स्वारी निघाली. दिवस उन्हाळ्याचे असल्यामुळें मार्गांत आघारी गांवीं दोन प्रहरीं विश्रांतीकरितां तात्पुरता मुक्काम केला. इकड कोथळरें गांवांतील पुढारी दातारादि तीन ब्राम्हणहि सरदारांच्या स्वागतार्थ 'आघारी' गांवीं आले. परस्परांचे कुशल प्रश्न झाल्यावर पुढाऱ्यांनीं आपणांबरोबर आणलेला नजराणा व तीन थंड पाण्याचे घडे सरदारांना समर्पण केले. आघारी गांवची वस्ती डोंगरावर असल्यामुळें स्वभावतः तेथें पाणी कमी, त्यांत चैत्र वैशाखाचा महिना. अर्थात् तेथें भरपूर उदक मिळणें कठीण. हें जाणून पुढाऱ्यांनीं आपणाबरोबर शीतोदक आणिलें होतें.

सरदारांनीं त्या सर्व पदार्थांचा योग्य परामर्श घेऊन आनंदानें म्हटलें :– तुम्ही केलेला हा सत्कार–विशेषतः ही तुमची समयसूचकता' पाहून संतोष झाला. तुम्हांला काय पाहिजे ? सरदारांची स्वारी आनंदित आहे असें पाहून तिघांनीं तीन गांव मागितले. त्यांत '**दातार**' उपनांवाच्या पुरुषानें 'आघारी' गांव मागितला- पुढें तेव्हांपासून तो पुरुष आपणाला 'आघारीकर' असें म्हणवूं लागला. म्हणून त्याच्या वंशांतील पुरुषहि दातार हें नांव टाकून आघारीकर या उपनांवानेंच व्यवहार करूं लागले[२]. याप्रमाणें दातारांचे आघारीकर झाल्याचा इतिहास आहे. कालांतरानें आघारीकर हें नांव लुप्त होऊन त्याचा अपभ्रंश आघारकर–आघरकर होऊन सांप्रत त्या घराण्यांतील लोक असाच व्यवहार करतात. तात्पर्य या लोकांनीं आपल्या 'आघारीकर' या नांवानेंच व्यवहार करणें शुद्ध. आघारकर–आघरकर लिहिणें कांहींसें युक्त होईल, पण 'आगरकर' लिहिणें अगदीं चूक ठरेल.

आधारकर घराण्याचा आज फारच विस्तार झाला आहे. मुंबई, पुणें, पेण, नागपूर, कलकत्ता इत्यादि दूर दूर ठिकाणीं असणारे आधारकर हे सर्व मूळचे कोळथरें येथीलच होत. यांचा कुलस्वामी केशवराज, आसूद, हा असून श्रीकोळेश्वर हा गावांतील मुख्य दैवत आहे. प्रसिद्ध गोपाळराव आधारकर यांचे पूर्वज लाटे भागवत यांजबरोबर टेंभूला रहाण्यास गेले.

१ थंड पाणी आणणें.

२ या घराण्याकडे आधारी गांवाची खोती चालू आहे. कमलाकर महादेव आधारकर सांगतात—आमचेकडे जुनीं कांहीं भांडीं आहेत त्यांत भांड्यावर दातार असें नांव लिहिलेलें आढळतें.

—: ० :—



# श्री. कोळेश्वराची आरति[1] नं. १

जय एकाक्षर[2] रूपाभेदत्रय होसी। रजतम सात्विक रूपें स्वरूपीं[3]
लासी॥ चतुरानन हरिहर या धरिलें नामासि। [4]सृजसि पालिसि
थरचर अंतीं संहरसि॥ जय जय कोळेश्वर त्रिगुणात्मक देवा।
रमुनि गण गंधर्वहि करिती तव सेवा॥ जय०॥ १॥ जिव शिव
रमात्माहि त्रिपुटी मावळली। देह ध्यातां ध्यानें उन्मनि स्थिर
ाली। साधुमुनि जन त्यातें निजमुक्ति कळली। निशिदिनीं हरि-
ध्यातां भवमाया सरली॥ जय० जय०॥२॥ त्रिगुणात्मक होऊ-
यांत्रिभुवन चालविसी। भार्गव रूपें भार्गव स्वरूपी झालासी।
ळथरें या ग्रामीं ज्योतिर्लिंग वससी॥ विश्वंभर विश्वात्मज ध्यातो
नाशि॥ जय० जय०॥ ३॥

## आरति नं. २

कल्मषभारें[5] मानव बहुतचि कष्टले। धर्मा टाकुनिया पाखंडी
ले। निर्गुणपरमेशातें विसरुनियां गेले। त्यांसि उद्धाराया शंकर
तरले। जय देव जय देव जय मुनि सुख धामा। आरती ओवाळूं
जन विश्रामा॥१॥ क्षेत्रीं[6] नांगरीतां या पुण्यग्रामीं[?] लाधलि मूर्ति
राता[7] पोखरितां भूमि। प्रगटे जग ताराया त्रिजगाचा स्वामी।
रजनीं[8] रचियेलें मंदिर बहु नामीं[9]॥ जय देव०॥२॥ कोळथरें
ग्रामीं सज्जन जे वसति। त्यांचें सद्भाग्य मी वर्णावें कीति॥
ुरहरातें प्रतिदिनी दर्शन पावति। भोगुनि सौख्या अंतीं कव-
ति ते मुक्ति॥ जय देव०॥३॥ मूर्तिशिळेची[10] रुचिरा नेत्रा सुख
। मस्तकीं श्रीगंगा नित्य अवतरते॥ सिंहनिनादें प्रतिदिनीं देवा-
घुमतें। साक्षात्कार देखुनि भजनीं मन रमतें॥ जय देव०॥४॥
। विष्णु महेशत्रिगुणात्मक मूर्ति। करितां पूजन भावें मन कामना

आरत्या–पदें, व अभंग सांप्रदायिक पद्धतीनेंच दिलीं आहेत. यांत
ीं शुद्धाशुद्ध, ऱ्हस्व, दीर्घ, कांहीं केलें नाहीं. कठीण शब्दांचा अर्थ ... १३ या
ा यथामति प्रयत्न केला आहे. २ ओंकाररूप ३ सगुणत्वाला ... करीन = असें
स. ५ पापाच्या भारानें. ६ शेत. ७ कोळी. ८ ग्रामस्थां
ग.

पुरती। स्वकृपाछत्राखालीं भक्तांच्या पंक्ति। आपत्तापासुनि[1] र
या जगतीं ॥ जय देव० ॥ ५ ॥ सुयश[2] दिगन्तरिं पसरे को
यांचें। शिव शिव हर हरनरवर[4] घोष करिती वाचे। टाळचा
प्रेमें थय् थय् जन नाचे। मूर्ति स्वयंभू देखुनि भक्ति मनीं
॥ जय देव० ॥६॥ भस्म विभूषित तनु जो व्याघ्रांबरधारी।
वरमंडित हर तो ध्यावा त्रिपुरारि। करतां पूजन भावें जो
हारी। तल्लिनतत्पदिं झाला नारायणभारी[5] ॥ जय देव०

भजन–कोळेश्वर शिवसांब सदाशिव कोळेश्वर शिवस

हें भजन जुनें

नवीन

**कोळेश्वर हरिब्रह्म सदाशिव कोळेश्वर हरि ब्रह्म**

शके १८५० सालीं देवाचे उत्साहांत ग्रामस्थांचे विनंतिवरू
(मी) कीर्तन केलें. त्यात पूर्वरंगांत श्रोत्यांना कोळेश्वर दैवत
असल्यानें देवाचें भजन हि त्रिगुणात्मकपर असणें योग्य. हें
तेव्हांपासून हेहि भजन म्हटलें जातें.

## पद १ लें.

**कोळेश्वर[1] हा चतुरक्षरवरमंत्र मना सोपा। इहपर सु**

१ संकटापासून. २ चांगली कीर्ति. ३ श्रद्धावान् मनुष्य. ४
आरति ५० वर्षांतील असावी. नारायण कवि कोण हें नि
नाहीं कदाचित् मु. आंजर्ले–तालुका दापोली, येथ
नारायणराव खांबेटे हे गृहस्थ असावेत. कारण श्रीकोळेश्
त्यंत श्रद्धा असल्यामुळें त्यांनीं कोळेश्वरावर कांहीं कवित्व
दोन्हीं आरतींत त्रिगुणात्मकपर वर्णन आहे. अ
न असून गांवांत सर्वत्र म्हटली जाते. ५ प्र
नों.



नीं जपतां नाशिल भवतापा ॥ध्रु०॥ कोमलपल्लववत्[1] पदयुगुलीं
ला सोडूं नको। कोविद[2] होऊनि अव्यभिचारिणी निर्मल भक्ति
को। कोटिजन्मकृत पातक नाशुनि जनन मरण उरको[3]। कोळ-
या ग्रामीं त्यांते पाहतां शव[4] 'नठको'[5] ॥१॥ लेशक्लेश[6]
र्जित होऊनि [7]तद्गत बा तरले। लेखवरासहि[8] पूज्यचि
भक्ति रसें धाले। लेख[9] असे तत्पुनरपि ऐशी नरतनु हे
मिळे। लेक-सुना-स्त्रीविषयीं मोहुनि खाशी किती झोले[10]
॥ कोळेश्वर०। [11]स्वशनासनभृत्-त्रिगुणात्मक जो पाळितसे
व।[12]सुश्रेयस्करभक्ता जैसा कमला[13]हरिदश्व।[14]श्ववृत्तिकर
ला जो कां अघनवरक्ताश्व। श्वाद्य न म्हणुनि अनन्य भजतो
पूजिति विश्व ॥३॥ कोळेश्वर०। रक्षी संता संतापावारुनि जो
र। रम्य शिरीं ज्या गंगावाहे अनुभव साचार। रचना तेथिल
पहातां विसरवी घरदार। रमवी यज्ञेश्वर [15]सुत–वामन
पढुनि कीर ॥ ४ ॥ कोळेश्वर०।

१ ज्ञाता–भक्त. २ संपो. ३ शांति. ४ उत्तरोत्तर
जावो. ५ 'लेशो संबंधगर्वयोः' या कोशावरून लेश शब्दाचा अर्थ
लेशक्लेश याचा अर्थ–गर्वाची पिडा. ६ तद्गत–तस्मिन् म्हणजे
कोळेश्वराचे ठिकाणीं गत म्हणजे प्राप्त = या सर्व चरणाचा अर्थ
ईकाराची पीडा टाकून = निरहंकार होऊन एकनिष्ठपणें जे
वराला शरण गेले ते तरले. संसारांतून मुक्त झाले. ७ लेख = देव
८ = लेखवर = इंद्र. 'जिष्णुर्लेखर्षभः शक्रः?' असा कोश आहे.
'वर' शब्द कवीने योजिला आहे. ८ येथें लेख शब्दाचा
घ्यावा. लेख–वचन. ९ झोकावे. मायामोहित होऊन किति झोले
र पुनःपुनः जन्म घेणें. ११ अत्यंत कल्याणकर. १२ सूर्य. १३ या
अर्थ काय ? १४श्व+अद्य = उद्यां भजन करीन–आज करीन = असें
भजणार १५ रुद्राभिषेक समयीं.

# पद २ रें

चला जाऊं कोळेश्वर पाहूं डोळे भरूनि । आहे ज्याचें ते
कोटी सूर्याहूनी । कैलासींचा राणा असुनि येथें अवतरलासि । उध्दर
भक्तजन हेंच ज्याचे मानसीं ॥ १ ॥ सिंहनादें तोषविशि कर
[6]आवर्तनीं । गंगा देऊनि पावन करिसि पाहती लोचनीं ॥२॥उत्स
हाचा थाट [7]कृष्णकार्तिकारंभीं । आनंदोनि [8]मुखवास करिति कैला
पतिसि ॥ ३ ॥ चौघड्याचा नाद पुढें, मागें तो छबिना । हरह
नामें गर्जोनि चालताति जाणा ॥ ४ ॥ [9]लुब्धोनियां नरनारी
आनंदें गर्जति । विसरूनि मी तूं पण अवघे नाचताति ॥ ५ ॥
प्रदक्षिणा करुनि उभेराहति द्वारीं । समर्पूनी सर्वहि [10]भाव तल्लिन
[11]कर्पूरगौरीं ॥ ६ ॥ करोनियां आरति दर्शना जाती । पाहोनि
सुंदरध्यान हृदयीं सांठविती ॥ ७ ॥ सांठवोनि ध्यान चिंति
[12]वेदस्तुति । करोनियां हरिकथा गुलाल उधळति ॥८॥ [13]पायांचा
मी दास मानुनि विनंति [15]परिसावी॥ [14]पात्रापात्र नेणुनि चिंति
त्वद्रूपीं [16]मिळवी॥ ९ ॥

---

६ कार्तिक कृष्ण ७ ला ललितोत्सव होतो ८ चांदीचा मुखवटा घालून देवाला शृंगारतात. ९ लुब्ध होऊन, देवाविषयीं प्रेमभरीत होऊन.. १० सर्वभाव समर्पण करणें म्हणजे निरहंकारवृत्तीनें राहणें ११ कापराप्रमाणें गौर असलेल्या कोळेश्वराचे ठिकाणीं. १२ पालखी झाल्या वर वेदपठण होतें. १३ शेवटीं कवि देवाला उद्देशून प्रार्थना करतो. १४ एकावी १५ योग्यायोग्य. १६ मनांत न आणतां तुझ्या स्वरूपांत मिळव–म्ह–ब्रह्मरूप कर. या पदाचा कर्ता कै. गजाननराव भावे होत. यांची देवाचे ठिकाणीं फार भक्ति होती. पदांत उत्सवांतील वर्णन आहे.



# गाणें १ लें

कुलस्वामिचें करीतें चिंतना । सिद्धि पावती देवा गजानना ।
रस्वती द्यावें हें वरदान । गुरुश्रोत्यांचे पदांसि वंदून । कुळस्वामी
कोळेश्वर जगजेठी ॥ ध्रु० ॥ कोळथरें गांवचे कोळ्याचे पुण्यफार ।
यांचे शेतांत प्रगटले परमेश्वर । ब्रह्मा विष्णु महेश त्रिगुणाकार ।
कोळी नांगरी आपलें शेत सारें । शिवामस्तकीं लागला नांगर ।
मस्तकांतूनि निघती रक्त धार । नागर भिजून झालासे अवघा लाल ।
कोळी पाहून मनांत चिंता थोर । भ्याला–घाबरला–कापतसें थर थर ।
नागर सोडून जोडिले दोन्हीकर ठेवि मस्तक जाऊनि चरणावर ।
प्रसन्न झालों इच्छिला मागें वर । कोळयानें नांव ठेंविलें कोळेश्वर ।
देऊळ बांधाया दिधलें शेत सारें । आपले चरणीं मुक्ति दे निरंतर ।
विमान आलें त्यावेळे तत्काळ । उठविला कैलासीं त्याला नेला ।
नेऊनि चरणीं ठाव दीला ॥ १ ॥ कुलस्वामी० ध्रु० ॥ कोळथरें गांवीं
कोळेश्वर देवराजा । कुलस्वामी धनी तो सांम्ब माझा । जटा, मुकुटीं
झळकती, शिरीं गंगा । भाळीं चंद्र तृतीय नेत्रीं ज्वाला । गज चर्मांबर
तो पांघुरला । गजानना अंकीं घे गिरिजेला ॥ २ ॥ कुळस्वामी० ।
ब्रह्मा विष्णु महेश नाम तया । त्रिगुण आत्मा देव हा त्यांचे ठायां ।
व्याघ्रांबर आसन बैसावया । सर्वभस्म सर्वहि अंगीं ल्याहिला ।
त्रिशूळ डमरु रुद्राक्ष माळा गळां ॥ ३ ॥ कुळस्वामी ० । कुळस्वामीचें
येस्थळीं महिमान । गंगा वाहते त्याचे जटेंतून । जवळ गणपति
लक्ष्मी नारायण । पाटा सन्निध खेम हा निदान । केशवराजा आसूद
महास्थान । येतां जातां तयाचे दर्शन । मागें मारुति अश्वत्थनारायण ।
पंचनदी पुष्करणी तीर्थगहन । गोडे आडाचें पाणी परिपूर्ण ।
त्याशीं पीताति सर्व जन । पीर, क्षीर, सागर संनिधान ॥४॥ कुळ०।
मग लाटयानीं बांधिलें देऊळ । गांवकरी समस्त अनुकूल । सेवा
करिति मिळुनी नारीनर । प्रदक्षिणा साष्टांग नमस्कार । पाणी
कळश्यांनीं आणुनि दोन्हीं करीं । नेऊनि घालिती मस्तकीं साम्बावरी
सिंहनाद ऐकती मधुर । ओवाळिती दीप आणि कर्पूर । धूप दीप

...चे अवर । त्यासीं प्रसन्न होतसे कोळेश्वर । नैवेद्य आणि ...ची बरोबर ॥५॥ कुळ० । नीलकंठ नाम शोभतें ज्याला ... केतां अंगाचा दाह झाला । रामनाम तो कंठीं धरणारा ...चि दाह तो शमला । रुद्रगणांचा समविता मेळा । स... स्मशानांत राहणारा । चिताभस्माचि प्रीति मोठी ज्याला ॥ ६ ॥ कुळ० ॥ कैलासींचा साम्ब हा कैंचा आला । जनाचिये भक्तिशीं प्रगटला । सागराचे तीरीं तो बैसला । पंचवदन[१] दहा जे हस्त ... त्याला । भस्म ऊटी रुंडांचे हार गळां । आणिक दैवत्य[२] आहे ... ग्रामयाला । अंबाबाई[३] शिवनंदी[४] त्याला । राधाकृष्णाचें[५] देऊळ ... उगवतेला । जनहि जाताती मढीचे[६] पाणियाला । त्याचा गुण ... बाजावें रोगीयाला । मढीसन्निध गणपति[७] जाऊं त्याला ॥ ७ ॥ कुळ० । वरद हस्त तयांचे पूर्वजांला । वंशपरम्परें हा वर दिला ... कृपादृष्टि पहातो बाळकांना । स्मरितांचि संकटीं पावे त्याला ... सत्यभामेचे[८] हृदयीं प्रगटला । सखु मागे चरणीं ठाव द्यावा ॥८॥ कुळस्रामी० ।

१ कोळेश्वर हें शिव दैवत आहे या भावनेनें हें वर्णन केलें आहे. २ या... कडव्यापासून अखेरपर्यंत गांवांतील सर्व देवतांचा उल्लेख केला आहे. ३ दुर्गादेवी, ४ बापेश्वर. ५ राधाकृष्णाचे देऊळ यांच्या पुर्वेस आहे. सुमारें १०० वर्षे स्थापनेला झालीं. ६ या नांवाचा एक झरा–लहान तळें–आहे. याचें उदक अत्यंत मधुर व हलकें असल्यामुळें रोग्याला बाधत नाहीं. ७ वरचा गणपति. परिशिष्ट १ लें पहा. ८. हें गाणें लाटे घराण्यांतील या नांवाच्या बाईनें ५० वर्षांपूर्वी श्रीदेवाचें दर्शन घेण्याकरितां आली असतां केलें. सखु हें तिचेंच माहेरचें नांव असावें. कवयित्रीनें गाण्यांत सर्व इतिहास उत्तम तऱ्हेनें ग्रथित केला असल्यामुळें ऐतिहासिक दृष्ट्या या गाण्याला महत्त्व आलें आहे, व म्हणूनच आम्हीं शुद्धाशुद्ध तसेंच ठेवून परंपरेप्रमाणें दिलें आहे.

संपूर्ण

श्री कोळेश्वरार्पणमस्तु

श्री